# अयोध्येचे नबाब.

( अयोध्या व लखनौ येथील स्थलवर्णनासह ).

श्लोक.

"भ्रातः कष्टमहो महान्स नृपतिः सामन्तचक्रं च तत्
पार्श्वे सा च विदग्धराजपरिषत्ताश्चन्द्रबिम्बाननाः ।
उद्वृत्तः स च राजपुत्रनिवहस्ते बन्दिनस्ताः कथाः
सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ॥ १ ॥

—भर्तृहरि.



इ० स० १८९९.

# अयोध्येचे नबाब.

(अयोध्या व लखनौ येथील स्थलवर्णनासह).

हें पुस्तक

**दत्तात्रय बळवंत पारसनीस**

"झांशीच्या महाराणी लक्ष्मीबाईसाहेब ह्यांचे चरित्र"
"मराठ्यांचे पराक्रम" इ० इ० पुस्तकांचे कर्ते

ह्यांनीं लिहिलें

तें

**मुंबईत,**

"तत्त्वविवेचक" छापखान्यात छापून प्रसिद्ध केलें.

सन १८९९.

**प्रकाशक:**
**बाबाजी सखाराम आणि कंपनी.**
युसफ बिल्डिंग, मुंबई.

किंमत १ रुपया.

हें पुस्तक

लखनौ येथील १५ व्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष

नामदार

**श्रीयुत रमेशचंद्र दत्त,**

सी. आय्. ई, बी. एल्.,

बरद्वानचे माजी कमिशनर आणि बंगाल
कायदे कौन्सिलचे सभासद

व

" हिंदुस्थानांतील प्राचीन सुधारणेचा इतिहास, "
" हिंदुस्थानचा अर्वाचीन व प्राचीन इतिहास, "
" बंगदेशीय वांग्मयाचा इतिहास, "
इत्यादि पुस्तकांचे कर्ते

त्यांस

**त्यांची इतिहासप्रियता, विद्वत्ता आणि स्वदेशभक्ति**
**इत्याद्यनेक प्रशंसनीय गुणांबद्दल**

प्रेमपूर्वक

**समर्पण केलें आहे.**

ग्रंथकर्ता.

"Where now the Pomp, which marks an Eastern Throne?
Where is the monarch, and his courtiers gone?
Yon lofty dome, in vain uplifts its head!
It marks but the spot, where rest the mighty dead!
But the lone lamp, which trembles in the tomb,
Is a fit emblem, of the unchanging doom.
Which awaits alike, the Tyrant, and the Slave,
The Free, the Generous, Virtuous, and the Brave,
Like that lone lamp, awhile life brightly burns,
Then smokes and flickers, and to ashes turns!"

—*K. M. Nicholson.*

# प्रस्तावना.



इतिहासाचें महत्त्व किती आहे हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. हॅरिसन नामक एका पाश्चात्य इतिहासशास्त्रवेत्यानें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "आपल्या सर्व भावी आशा गतकालांतील गोष्टींच्या परिपक्क ज्ञानावर अवलंबून आहेत." म्हणजे, मनुष्याच्या भावी उन्नतीच्या आशा इतिहासावर अवलंबून आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्यावरून इतिहास हा मनुष्याच्या उन्नतीचें मूळ बीज आहे व त्याचे प्रकाशन व पुनरुज्जीवन करणें हें प्रत्येक राष्ट्रहितचिंतकाचें कर्तव्य आहे, असें मानिलें पाहिजे. आजमित्तीस जीं पाश्चात्य राष्ट्रें सुधारणेच्या व वैभवाच्या शिखरास पोहोंचलीं आहेत, त्यांस ही उत्कर्षस्थिति प्राप्त होण्यास त्यांच्या राष्ट्राचा इतिहास पुष्कळ अंशीं कारणीभूत झाला आहे. म्हणून त्यांस इतिहासाचें महात्म्य आतिशय वाटून तत्प्रकाशनार्थ त्यांचे बहुविध प्रयत्न एकसारखे चालले आहेत. हें इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी वगैरे देशांच्या इतिहासावरून दिसून येईल. पाश्चात्य राष्ट्रांप्रमाणें आपल्या देशाचीं इतिहासाचीं साधनें अद्यापि प्रसिद्ध नाहींत, तथापि त्या राष्ट्रापैकीं एका प्रबल व प्रतापी राष्ट्राचा हिंदुस्थानाशीं दृढ संबंध जडल्यामुळें त्याच्या संसर्गानें व संस्करणानें आमच्या देशाच्या इतिहासाची अभिरुचि व प्रीति आम्हांस वाटूं लागली आहे ही संतोषाची गोष्ट होय.

हिंदुस्थानचा इतिहास म्हणजे विभिन्न राष्ट्रसमुच्चयाचा इतिहास आहे. त्याचें प्रकाशन करावयाचें म्हणजे प्रथम त्यातील निरनिराळ्या भागाच्या इतिहासाची सामग्री सिद्ध करून ते प्रकाशित केले पाहिजेत. नंतर त्यांची संगति जुळवन सर्व राष्ट्रांचे परस्पर संबंध लक्ष्यांत घेतले पाहिजेत. ह्यांवाचून त्या इतिहासाचें सोज्वल स्वरूप कधींही व्यक्त होणार नाहीं. उदाहरणार्थ, महाराष्ट्र राज्यसत्तेचा इतिहास जरी तयार करावयाचा झाला तरी त्यास दिल्लीचे मोंगल बादशहा; हैदराबाद बंगाल आणि अयोध्या येथील मुसलमान सुभेदार; राजस्थानांतील रजपुत राजे; पंजाबांतले शीख राजे; कर्नाटकांत पाळेगार

संस्थानिक ह्या सर्वांची संपूर्ण माहिती मिळणें अवश्य आहे. ही माहिती प्राप्त होईपर्यंत तो इतिहास कधींही परिपूर्ण होणार नाहीं. ह्याकरितां मराठ्यांच्या इतिहासास साधनीभूत होणाऱ्या ह्या निरनिराळ्या भागांच्या माहितीचाही शोध करणें जरूर आहे. अशा प्रकारच्या शोधाचें फल प्रकृत ग्रंथ हा होय.

अयोध्येच्या इतिहासाचा संबंध मराठ्यांच्या इतिहासांशीं फारच निकट आहे. येथील पहिले तीन नवाब—सादतखान, मनसूरअली व सुजाउद्दौला हे मराठ्यांच्या उत्तरेकडील राजकारणांत समाविष्ट असून त्यांच्यापैकीं शेवटचा नवाब सुजाउद्दौला ह्यानें पानिपतच्या लढाईंत मराठ्यांचा कधींही विस्मरण न होण्यासारखा घात केला; परंतु मराठ्यांच्या रणशूर वीरांनीं त्याचें प्रायश्चित त्यास दिलें; हें इतिहासावरून कळून येतें. तेव्हां ह्या तीन नवाबांचा व त्यांच्या वंशजांचा वृतात समजणें जरूर आहे. दक्षिणेंतील हैदराबादेप्रमाणें लखनौचें प्रचंड राज्य असून त्याच्या संपत्तीची व राज्यवैभवाची कीर्ति जुन्या लोकांच्या तोंडून ऐकूं येते. परंतु तेथील नवाबांची माहिती महाराष्ट्रवाचकांस उपलब्ध नाहीं ही केवढी शोचनीय स्थिति आहे? ही स्थिति नाहींशी होऊन तेथील इतिहासाचें आपणास ज्ञान व्हावें ह्या उद्देशानें हा ग्रंथ लिहिला आहे. ह्यांत अयोध्या संस्थानाची स्थापना होऊन तें खालसा होईतोंपर्यंत तेथें झालेल्या सर्व नवाबांचीं संक्षिप्त चरित्रें दिलीं आहेत. तीं बोधपर व मनोरंजक होतील अशी आशा आहे.

अयोध्येच्या इतिहासावर एके ठिकाणीं संगतवार असे ग्रंथ उपलब्ध नसल्यामुळें निरनिराळ्या इंग्रजी पुस्तकांच्या आधारानें ही माहिती जमा केली आहे. तींत क्वचित् दोष असण्याचाही संभव आहे. परंतु ह्या पुस्तकाचा उद्देश इतिहासजिज्ञासूंस अयोध्येच्या नवाबाची ओळख व्हावी व ह्या इतिहासाचीं समग्र साधनें प्रसिद्ध करण्याची त्यांस प्रेरणा व्हावी इतकाच आहे. अनुपलब्ध विषयावर ग्रंथ लिहितांनां कितीही काळजी घेतली तरी त्यांत माहितीच्या अपूर्णत्वामुळें व संदिग्धतेमुळें दोष होण्याचा संभव असतो; हे सूज्ञ वाचकांस निराळें सांगावयास नकोच आहे ह्या पुस्तकाचे कामीं अयोध्येचे इंग्रजी ग्याझिटियर,

अयोध्या संस्थानचे पार्लमेंटरी पेपर्स, आर्यव्हिन, स्लीमन, लॉरेन्स ह्यांचे निरनिराळे लेख, ह्यांचा विशेषेंकरून उपयोग झाला हे येथें कळविणें अवश्य आहे.

पुस्तकाचे शेवटीं, अयोध्या व लखनौ ह्या दोन इतिहासप्रसिद्ध स्थलांचें वर्णन दिले आहे. ह्या वर्णनापैकीं काहीं भाग पुणे येथील 'केसरी' पत्रामध्यें 'उत्तर हिंदुस्थानातील प्रवास' ह्या शिरोभागाखालीं मागें प्रसिद्ध झाला होता. तो बहुतेक नवीन लिहून ह्या पुस्तकांत समाविष्ट केला आहे. त्याप्रमाणें लखनौच्या नवाबांचीं जीं चित्रें उपलब्ध झालीं तींही ह्यांत घातलीं आहेत. ह्या प्रयत्नाचा वाचकांनीं स्वीकार केला ह्मणजे सर्व परिश्रमाचें चीज होईल.

मुंबई.—
ता. २४-१२-९९.

पुस्तककर्ता.

# अनुक्रमणिका.

# अयोध्येचे नबाब.

## भाग १ ला.

### अयोध्या—देशस्वरूप व प्राचीन माहिती.

अयोध्या अथवा औंध हा अत्यंत सुपीक प्रदेश हिंदुस्थानच्या उत्तरेस नगाधिराज हिमालय व पुण्यसरिता भागीरथी ह्यांच्या मध्यंतरीं वसलेला आहे. ह्याच्या उत्तरेस व ईशान्येस नेपाळ संस्थान, आग्नेयेस अझीमगड व जानपूर, दक्षिणेस अलहाबाद, नैर्ऋत्येस गंगायमुनेच्या दोआबामधील फत्तेपूर, कानपूर आणि फरुकाबाद हे तीन जिल्हे, आणि वायव्येस शहाजहानपूर अशी चतुःसीमा आहे. हा प्रांत उत्तर अक्षांश २३° आणि पूर्व रेखांश ८२° ह्यांमध्यें असून ह्याची लांबी २७० मैल व रुंदी १६० मैल आहे; आणि एकंदर क्षेत्रफळ २३,९२३ चौरस मैल आहे. हा प्रदेश उन्नतावनत असून ह्यामध्यें अनेक जलप्रवाह आहेत. त्यांमध्यें शरयू ऊर्फ घोग्रा, चवका, गोमती आणि साई ह्या मुख्य नद्या आहेत. ह्यांशिवाय ह्या प्रांताच्या सरहद्दीवर गंगेचा प्रचंड प्रवाह वाहत असल्यामुळें एकंदर प्रदेश जलपूर्ण आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या नद्यांच्या विपुल जलामुळें सर्व जमीन सुपीक झाली असून जागोजाग विविध वृक्षांच्या बहुविध राया आणि सुंदर लतांचीं मनोरम उद्यानें ह्या प्रांतामध्यें अनेक आहेत. 'गंधर्ववन' म्हणून रामायणामध्यें ज्याचें वर्णन केलें आहे तें सुप्रसिद्ध कानन पूर्वी ह्याच प्रांतांत म्हणजे शरयूच्या उत्तरेकडील प्रदेशांत अंतर्भूत होतें असें म्हणतात. तेव्हां ह्या प्रांताच्या समृद्धतेबद्दल अधिक वर्णन करण्याचें प्रयोजनच नाहीं. सृष्टिसौंदर्यासंबंधानें पाहूं गेलें तर

निसर्गदेवता ह्या प्रांतामध्यें मूर्तिमंत वसत असल्यामुळें तें अगदीं अपूर्व आहे. सृष्टिसौंदर्याचें वर्णन करितांना एका संस्कृत कवीनें—

**श्लोक.**

हरिणचरणक्षुण्णोपान्ताः सशाद्वलनिर्झराः ।
कुसुमललितैर्विष्वग्वातैस्तरंगितपादपाः ॥
विविधविहगश्रेणीचित्रस्वनप्रतिनादिता ।
मनसि न मुदं दध्युः केषां शिवा वनभूमयः:* ॥ १ ॥

म्हणून जें वर्णन केलें आहे, त्याचा अनुभव अयोध्याप्रांतांत अनेक स्थलीं पूर्णपणें येऊन सृष्टिसौंदर्यविलासी जनांस परमानंद वाटतो. तात्पर्य, धनधान्यसमृद्धता आणि सृष्टिवैभवप्रचुरता इत्यादि गुणांनीं हा प्रदेश संपन्न असल्यामुळें ह्यास "हिंदुस्थानची उद्यानभूमि" ( Garden of India ) असें पाश्चात्य जनांनीं अभिधान दिलें आहे, तें अगदीं यथार्थ आहे.

अयोध्याप्रांताचे राज्यव्यवस्थेसंबंधानें मुख्य चार विभाग केलेले असून त्या प्रत्येकामध्यें तीन तीन जिल्हे समाविष्ट केले आहेत. ते येणेंप्रमाणें:—

१ लखनौ—ह्यांत १ लखनौ, २ बाराबंकी, ३ उनाव असे तीन जिल्हे आहेत.

२ रायबरेली—ह्यांत १ रायबरेली, २ सुलतानपूर आणि ३ प्रतापगड असे तीन जिल्हे आहेत.

---

*भावार्थः—ज्या ठिकाणीं हिरवेंचार गवत उगवलें आहे; आजूबाजूस सुंदर झरे वाहत आहेत; जवळ हरिणें चरत आहेत; पुष्पांच्या संसर्गानें सुगंधी झालेले वायु वाहत असून त्यांच्या वेगानें वृक्ष डोलत आहेत; व अनेक पक्षी मंजुळ शब्द करीत असल्यामुळें तो सर्वभाग नादमय होऊन गेला आहे; अशा प्रकारचे रमणीय वनप्रदेश कोणाच्या बरें मनास आनंद देणार नाहींत?

३ फैजाबाद—ह्यांत १ फैजाबाद, २ गोंडा आणि ३ बाहरैच असे तीन जिल्हे आहेत.

४ सीतापूर—ह्यांत १ सीतापूर, २ हरदुई आणि ३ खेरी असे तीन जिल्हे आहेत.

ह्या चारी विभागांत बरींच इतिहासप्रसिद्ध स्थळें आहेत, तथापि त्यांमध्यें लखनौ आणि अयोध्या हीं दोन स्थळें विशेष अग्रगण्य असून वर्णनीय आहेत. अयोध्याप्रांतांत वसत असलेल्या सृष्टि-वैभवास अनुरूप असें त्यांचें राज्यवैभवही अपार असल्यामुळें त्यांचें वर्णन पृथक् सादर करणें भाग आहे.

सृष्टिवैभव आणि राज्यवैभव ह्यांचा परस्पर संयोग झाल्यामुळें ह्या प्रांताचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास अत्यंत मनोहर असला पाहिजे असें कोणासही वाटेल व तें अगदीं साहजिक आहे. परंतु हिंदुस्थानच्या एकंदर इतिहासाच्या स्थितीप्रमाणें अयोध्याप्रांताच्या प्राचीन इतिहासाची स्थिति शोचनीय आहे. महाकवि वाल्मीकि यांनीं रामायणासारखें वीरचरितवर्णनपर महाकाव्य लिहिल्यामुळें पौराणिक कालाचा इतिहास त्या रूपानें प्रसिद्ध आहे व त्यामुळें अयोध्येची कीर्ति अजरामर झाली आहे. परंतु त्यापुढील कित्येक शतकांचा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. दाशरथी रामाच्या चरित्राची थोरवी अगदीं अलौकिक आहे. त्यामध्यें मनुष्यस्वभा-वांतील अत्युच्च व अत्युत्तम गुणांचें चित्र इतकें सुंदर काढिलें आहे कीं, त्यापुढें कल्पनेची गति कुंठित झाली आहे असें म्हणणें भाग पडतें. रामायणाचा काल सरासरी ख्रिस्ती शकापूर्वी १००० वर्षें मानिला तरी त्यापुढील इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. सूर्यवंशाचा शेवटचा राजा निहत्पाल हा इ० स० पूर्वी इ० स० १४२६ मध्यें एका रणकंदनामध्यें पतन पावला अशी दंतकथा आहे. ती गृहित घेऊन

चाललें तरी त्या कालापासून विक्रमादित्य राजा अवतीर्ण होईपर्यंत ह्या प्रांताच्या इतिहासाचा अगदींच मागमूस नाहीं. विक्रमादित्याचा ह्या प्रांतावर अंमल होता असें मानण्यासही सबळ पुरावा नाहीं. ह्यूवेन त्संग नामक प्रसिद्ध चिनी प्रवासी इ० स० ६२९ ते इ० स० ६४२ ह्यांच्या दरम्यान हिंदुस्थानांत आला होता. त्यानें आपल्या प्रवासवर्णनांत कोणी विक्रमादित्य नामक बौद्धधर्मनिषेधक व ब्राह्मणमतानुयायी राजा स्रावस्ती ऊर्फ अयोध्यानगरीमध्यें राज्य करीत होता असें लिहिलें आहे. त्याच्याच आधारावरून पुराणवस्तुसंशोधक खात्याचे (Archœological Department) अधिकारी जनरल कनिंगह्याम ह्यांनीं ह्या नगरीच्या पुनःसंस्थापनेचें यश त्यास दिलें आहे. हिंदु लोकांमध्येंही अशी एक दंतकथा प्रचलित आहे कीं, ह्या राजानें पूर्वींच्या अयोध्या नगरीचा शोध केला आणि श्रीरामाच्या वेळचीं प्राचीन स्थळें शोधून काढिलीं. ह्यानेंच श्रीराम, लक्ष्मण, सीता, भरत आणि शत्रुघ्न ह्यांच्या विमल कीर्तीच्या संस्मरणार्थ ३६० देवालयें बांधिलीं. परंतु ह्या देवालयांपैकीं एक तरी देवालय सांप्रत विद्यमान आहे असें खात्रीनें सांगणें कठीण आहे. नागेश्वर महादेव म्हणून जें एक देवालय आहे तें मात्र प्राचीन असून, बाकीचीं सर्व देवालयें एक दोन शतकांतच बांधलेलीं आहेत. प्राचीन देवालयें कालवैचित्र्यानें व यवनांच्या द्वेषानें नष्ट झालीं असून, फक्त त्यांचीं जुनीं स्थानें ह्या देवालयांनीं सुशोभित केलीं आहेत असेंही कित्येकांचें मत आहे.

रामनामाचा व अयोध्येचा जितका संबंध आहे तितकाच बुद्धाचाहि आहे. सुप्रसिद्ध बुद्ध हा शाक्य घराण्यांतील एक नृपति असून त्याचा सूर्यवंशाशीं संबंध होता अशीही दंतकथा आहे. ह्या राजाचा अयोध्येवर कांहीं दिवस अंमल असून तो अयोध्येच्या उत्तरेस ९०

मैलांवर **साहेतमाहेत** म्हणून जें नाश पावलेलें एक प्राचीन नगर आहे तेथें राज्य करीत होता. येथें सुमारें पांच शतकें **बौद्ध**शाखेच्या राजांचा अंमल होता. **गौतम बुद्धाचे** कारकीर्दींत **साहेतमाहेत** ही **प्रसन्नजित** नामक राजाची राजधानी असून त्या राजानें नूतन धर्माचा म्हणजे बुद्धधर्माचा स्वीकार केला होता. त्याचा मुलगा **विरुदत्त** ह्यानें **शाक्यांचा** छल करून त्यांच्या प्रांतावर अनेक स्वाऱ्या केल्या. **साहेतमाहेत** हे **मगध** देशाच्या **गुप्त** राज्याचें एक मांडलिक संस्थान असून त्या राज्याचा लय झाल्यानंतर त्याचाही इ० स० ३१९ मध्यें लय झाला असावा असें दिसतें.

ह्या कालानंतर पुढील कित्येक शतकांचा **अयोध्येचा** इतिहास उपलब्ध नाहीं. तथापि इ० स० १०५० पर्यंत हा प्रांत **पाटणा** आणि **कनोज** येथील राजांच्या ताब्यांत होता असें स्थूलमानानें म्हटलें तरी चालेल. ह्या समयास **भार** नामक लोक–ज्यांचे वंशज अद्यापि **फैजाबाद** व **सुलतानपूर** ह्या जिल्ह्यांमध्यें आहेत–त्यांनीं **बंड** करून **कनोजची** राज्यसत्ता झुगारण्याचा यत्न केला. त्यांत त्यांस चांगलें यश आलें व त्यांच्यापैकीं **बाल** व **दाल** ह्या दोन पुरुषांच्या संयुक्त कारकीर्दींत त्यांच्या राज्यसत्तेचा चांगला अभ्युदय होऊन तिचा प्रसार **माळवा** प्रांतापर्यंत झाला. ह्यांच्या ताब्यामध्यें **करा** व **कलिंजर** हे दोन किल्ले होते. कालचक्राच्या विचित्र गतीनें ह्या सत्तेचा लवकरच नाश झाला. **दिल्लीचा** बादशहा **नासिरुद्दीन महमद** ह्यानें इ० स० १२४६ मध्यें ह्या **भार**राज्यसत्तेचा समूळ नाश करून तो प्रांत आपल्या ताब्यामध्यें घेतला. ह्या राज्यक्रांतीची हकीकत **फेरिस्तानें** आपल्या इतिहासांत दिली आहे. **नासिरुद्दीन महमद** ह्याचें ह्या प्रांतावर सार्वभौमत्व संस्थापित झाल्यावर **अयोध्येमध्यें** लहान लहान संस्थानें बरींच निर्माण झालीं. तीं **मुसलमान सत्तेशीं**

टक्कर देऊन अद्यापि जीवमान राहिलीं आहेत. अयोध्येच्या दक्षिण भागांत क्षत्री लोकांची जी वसाहत झाली तिचा काल हाच असावा, असा अदमास आहे.

अयोध्याप्रांतावर मुसलमानांची पहिली स्वारी गझनीचा प्रसिद्ध सुलतान महमूद ह्याचा भाचा सय्यद सालर मसाउद गाझी यानें केली. ह्या स्वारीचें वर्णन 'मीरत–इ–मसाउदी' ह्या पुस्तकांत अबदुल रहिमान चिस्ती ह्या ग्रंथकारानें, खुद्द सालर मसाउद याच्या स्वारींत हजर असलेल्या कोणी मुल्ला महमद गझनवी नामक सरदाराच्या जुन्या माहितीवरून लिहिलें आहे. मुसलमानी इतिहासग्रंथांचे प्रकाशक सर हेन्री इलियट ह्यांनीं हा ग्रंथ एक 'ऐतिहासिक कादंबरी' आहे असें म्हटलें आहे. परंतु जनरल कनिंगह्याम ह्यांचें मत असें आहे कीं, ह्याच ग्रंथावरून अयोध्येच्या इतिहासाची कांहींशी व्यवस्थित माहिती मिळते. सय्यद सालर मसाउद ह्याचें चरित्र फार विस्तृत आहे, परंतु तें येथें देण्याचें कारण नाहीं. हा गझनीच्या महमुदाचा मेहुणा व सेनापति सय्यद साहू ह्याचा मुलगा असून, आपल्या बापाच्या बरोबर अनेक युद्धप्रसंगांत हजर असल्यामुळें युद्धकलाविशारद झाला होता. त्यास सुलतान महमूद ह्यानें अयोध्याप्रांत सर करण्याकरितां पाठविलें होतें. खुद्द सुलतान महमूद कनोजपर्यंत स्वाऱ्या करून आला होता, परंतु अयोध्या प्रांत त्याच्या ताब्यांत आला नाहीं. सय्यद मसाउद ह्याशीं अयोध्येंतील लहान लहान राजे ह्यांनीं प्रथमतः सलोख्याचें वर्तन केलें, परंतु त्यास पादाक्रांत करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा अनावर झाल्यामुळें त्यानें त्यांशीं युद्ध करण्याचा बेत केला. त्या वेळीं अयोध्येच्या सर्व संस्थानिकांस विशेष स्फुरण येऊन त्यांनींही त्याच्याशीं टक्कर देण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें त्यांच्या व त्याच्या अनेक लढाया झाल्या. अखेर सोहलदेव नामक साहेतमाहेत येथील राजानें त्याशीं निकराचें युद्ध करून

त्यास ता० २० रजब ४२४ हिजरी म्हणजे ता० १४ जून इ० स० १०३३ ह्या रोजीं, आपल्या तीव्र बाणानें गतासु केलें, आणि त्याच्या खाशा सैन्याचा वध केला. ह्या युद्धामध्यें अयोध्येच्या हिंदु राजास यश आल्यामुळें ते कांहीं काल–सुमारें १६० वर्षें–पर्यंत यवनसत्तेच्या ताब्यांत न जातां स्वतंत्र राहिले. परंतु पुढें शहाबुद्दीन घोरी ह्यानें इ० स० ११९३ मध्यें सर्व प्रदेश पादाक्रांत करून दिल्लीच्या सिंहासनावर कुतुबुद्दीन ऐबक ह्यास अधिष्ठित केल्यानंतर अयोध्येसही अविंधसत्तेचा स्वीकार करणें भाग पडलें.

सय्यद सालर मसाउद ह्याचा सात्रिक येथें एक दरगा असून तेथें अद्यापि प्रतिवार्षिक यात्रा भरत असते. हा फार थोर पुरुष होता अशी प्रसिद्धि असल्यामुळें त्याच्या दरग्याच्या दर्शनास सुलतान महमद तघलक याची स्वारी इ० स० १३४० मध्यें गेली होती. ह्यानें रदौली येथील एका तेल्याच्या मुलीशीं लग्नकरण्याचा निश्चय केला होता म्हणून अद्यापि तेथील लोक त्या यात्रेस जात असतात. मुसलमान लोकांस हा पुरुष फार पूज्य असून, अयोध्येचे मुसलमान आपला उगम सय्यद सालर ह्याच्या वेळेपासून आहे अशी बढाई मारीत असतात.

सय्यद सालर मसाउद ह्याच्या स्वारीपासून सादतखान ह्यास अयोध्येची सुभेदारी मिळेपर्यंत–म्हणजे स्थूलमानानें इ० स० १०३० पासून इ० स० १७२४ पर्यंत–अयोध्येच्या इतिहासाची खात्रीलायक माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. ह्या प्रांतांतील लोकांमध्यें अनेक दंतकथा प्रचलित आहेत; परंतु त्या विसंगत व अविश्वसनीय असल्यामुळें त्यांचा इतिहासास यत्किंचितूही उपयोग नाहीं. मुसलमान इतिहासकारांनीं कांहीं गोष्टी लिहिलेल्या क्वचित् स्थळीं सांपडतात; परंतु त्याही अपूर्ण व निरनिराळ्या प्रत्यंतर पुराव्यानें सिद्ध न झालेल्या अशाच आहेत. तथापि त्यांतील स्थूल माहितीवरून असें दिसून येतें कीं,

इ० स० १२२६ मध्यें मलिक नासिरुद्दीन हा अयोध्येचा अधिपति होता व त्यानें भार लोकांचें वर्चस्व कमी करून त्यांना दाबांत ठेविलें होतें. इ० स० १२४२ मध्यें दिल्लीपति अल्लाउद्दीन ह्यानें आपला चुलता नासिरुद्दीन ह्यास अयोध्या प्रांतांतील बाहरैच येथील सुभेदार नेमिलें. त्यानें तेथें शांतता ठेवण्याचा यत्न करून तेथील प्रजेची स्थिति सुधारली. ह्याच्या कारकीर्दींत बाहरैच प्रांताचा चांगला उत्कर्ष झाला. हाच नासिरुद्दीन पुढें दिल्लीचा बादशहा झाला व ह्यानें दाल व बाल ह्या भार लोकांच्या अधिपतींचा इ० स० १२४६ मध्यें पराभव केला. त्याचा उल्लेख वर केलाच आहे. परंतु ह्याबद्दल बराच संशय आहे. इ० स० १२८० मध्यें अयोध्येवर एक सुभेदार नेमिला होता असा उल्लेख सांपडतो, परंतु त्याचें नांव समजत नाहीं. तात्पर्य, इ० स० १३५० पर्यंत अयोध्येमध्यें मुसलमानांचें विशेष प्राबल्य नव्हतें. त्यानंतर उत्तरेकडून येणाऱ्या अविंधसत्तेच्या लाटांबरोबर मुसलमानांची वस्ती वाढत चालली व विशेषेंकरून हरदुई, लखनौ, बाराबंकी व फैजाबाद येथें त्यांचा भरणा विशेष झाला. अयोध्येच्या सुभ्याची माहिती अकबर बादशहाच्या कारकीर्दीपासून कांहींशी विश्वसनीय समजते. अकबरानें इ० स० १५९० मध्यें हिंदुस्थानचे एकंदर बारा सुभे केले. त्यांत अयोध्या ऊर्फ औध हा एक सुभा केला. त्या वेळीं ह्या सुभ्याची चतुःसीमा आतांप्रमाणें नसून त्यांत गोरखपूर जिल्ह्याचा समावेश होत होता, व फैजाबादेचा बहुतेक भाग त्यांत अंतर्भूत होता. अबुलफजल ह्यानें आपल्या ‘ऐनेअकबरी’ ह्या ग्रंथांत, अयोध्येच्या सुभ्याची लांबी, सरकार गोरखपुरापासून सरकार कनोजपर्यंत १३५ कोस, आणि रुंदी सिद्दीपुरापासून अलहाबादच्या सुभ्यापर्यंत ११५ कोस अशी दिली आहे. ह्या वेळीं सुभेदार वारंवार बदलत असल्यामुळें

सुभ्याच्या राजधानीचें ठिकाण एकच कायम ठरलेलें नसे. सुभेदारांची बदली तीन चार वर्षांच्या आंतच बहुतकरून होत असे. शिवाय कित्येक सुभेदार बादशहाच्या मर्जीतले असल्यास दिल्ली-दरबारींच राहत असत, व सुभ्याचा वसूल घेण्यापुरते त्या प्रांतांत जात असत. सादतखानाकडे अयोध्येची सुभेदारी आल्यानंतर तोही बरींच वर्षे दिल्लीदरबारांत होता. त्याचप्रमाणें त्याचा वारस मनसूरअल्ली सफदरजंग हाही दिल्लीस होता. अयोध्येची राजधानी फैजाबाद ही सुजाउद्दौल्याचे कारकीर्दींत झाली व लखनौ येथें असफउदौल्यानें गादी संस्थापित केली. सादतखानाच्या कारकीर्दीपासून अयोध्येचा इतिहास विश्वसनीय असून फार महत्त्वाचा आहे. दिल्लीची सार्वभौमसत्ता विलय पावून हिंदुस्थानांत जीं स्वतंत्र राज्यें निर्माण झालीं त्यांपैकीं हैदराबाद आणि अयोध्या हीं दोन फारच बलाढ्य होत. मराठ्यांच्या राष्ट्राचा उत्कर्ष होऊन त्यांच्या सत्तेनें सर्व हिंदुस्थान व्यापून टाकिलें, तरी ह्या दोन प्रचंड राज्यांनीं आपलें स्वातंत्र्य नष्ट होऊं दिलें नाहीं. मराठ्यांस अविच्छिन्न सार्वभौमत्व स्थापन करण्यास उत्तरेकडे अयोध्येचे नबाब व दक्षिणेकडे हैदराबादेचे निजाम हे दोन प्रतिस्पर्धी बरेच त्रासदायक झाले, व कांहीं अंशीं त्यांच्याच योगानें परद्वीपस्थ लोकांस हिंदुस्थानांत प्रबल होण्यास संधि सांपडून, त्यांच्याच साहाय्यानें महाराष्ट्रसत्तेचा विध्वंस करण्यास त्यांस अधिक सुगम झालें, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. ह्या दृष्टीनें अयोध्येचा इतिहास महत्त्वाचा आहेच, तथापि तेथील नबाबांचीं चरित्रें त्यांच्या विशिष्ट गुणांमुळें फार महत्त्वाचीं असून त्यांत अयोध्येच्या इतिहासांतील अत्यंत मनोरम व अप्रसिद्ध माहिती व्यक्त होत असल्यामुळें तीं क्रमशः आम्ही सादर करितों.

# भाग २ रा.

## सादतखान.

(इ० स० १७२०-इ० स० १७३९.)

औरंगजेब बादशहा मृत्यु पावल्यानंतर दिल्लीची बादशाही कमजोर झाली आणि 'बळी तो कान पिळी' ह्या म्हणीप्रमाणें ज्याच्या अंगीं कर्तृत्वशक्ति व धाडस हे गुण अधिक होते त्यांना उदयास येण्यास संधि सांपडली. अशा समयास जे पुरुष महत्पद पावून स्वसत्ताधारी बनले त्यांत सादतखान व निजामउल्मुल्क हे प्रमुख होत. सादतखान ह्याचें मूळचें नांव महमद अमीन असें असून तो एका थोर सय्यद कुळांत जन्म पावला होता. मुसलमान धर्माचा संस्थापक जो महमद पैगंबर त्याच्या वंशजापैकीं सहावा इमाम मुसा काझीम हा सादतखानाचा पूर्वज होय, असा उल्लेख सांपडतो. मुसलमानी इतिहासकार अलेक्झांडर डो ह्यानें सादतखान हा एका दारोदार फिरणाऱ्या इराणी व्यापाऱ्याचा मुलगा होता असें लिहिलें आहे; परंतु ती गोष्ट साधार नाहीं. कारण, ह्या इतिहासकारास सादतखानाचा नातू सुजाउद्दौला ह्यानें कांहीं देणगी दिली नसल्यामुळें, त्यानें त्यावर रुष्ट होऊन त्याचे पूर्वज उच्च कुलांतील नव्हते असें दाखविण्याचा यत्न केला आहे!

सादतखान ह्याचे पूर्वज अधिकारसंपन्न व प्रतिष्ठित वर्गापैकी होते. ह्यांचें राहण्याचें मूळ ठिकाण खोरासान जिल्ह्यांतील नैशापूर हें गांव होय. उत्तरेकडील मुसलमानांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून तेथील हिंदूंची साम्राज्यसत्ता नष्ट केली व तेथें आपला अंमल बसविला, त्या वेळीं आपला भाग्योदय करून घेण्याकरितां जीं मुसलमान घराणीं हिंदुस्थानांत आलीं, त्यांपैकीं सादतखानाचे पूर्वज



**SADAT-KHAN.**

**सादतखान.**

**( इ० स० १७२०—इ० स० १७३९ ).**

हे एक होत. सादतखानाचा बाप मिर्झा नासीर हा औरंगजेबाचा मुलगा बहादूरशहा ह्याच्या पदरीं मोठ्या अधिकारावर अधिष्ठित होता व पुढें कांहीं दिवस तो पाटणा येथील सुभेदारीवर होता. तेथेंच सादतखान याचा थोरला भाऊ सयादतखान हाही होता. सादतखान आपल्या बापास भेटण्याकरितां इ० स० १७०९ मध्यें हिंदुस्थानांत आला. त्या वेळीं त्याचें अगदीं अल्पवय होतें. तो आल्यानंतर कांहीं वर्षांनीं त्याचा बाप मृत्यु पावला. तेव्हां तो व त्याचा भाऊ हे दिल्लीस गेले. त्या वेळीं दिल्ली येथें बडे बडे अमीर व उमराव ह्यांचें प्राबल्य विशेष असल्यामुळें त्यांनीं त्यांचा आश्रय संपादन केला. सरबुलंदखान ऊर्फ नबाब मुबारिझउल्मुल्क जो पुढें फरुखसियर बादशहाचे कारकीर्दींत इ० स० १७१७ मध्यें पाटणाचा सुभेदार झाला, व महमदशहाचे कारकीर्दींत इ० स० १७२४ मध्यें गुजराथचा सुभेदार झाला, तो ह्या वेळीं बादशाही दरबारांत बराच नांवारूपास चढला होता. त्याच्या खासगीकडे सादतखान ह्यानें प्रथम नौकरी संपादन केली. सरबुलंदखान ह्याचा स्वभाव फार गर्विष्ट व मानी असल्यामुळें त्यानें सादतखानाची एका क्षुल्लक प्रमादाबद्दल एके वेळीं निर्भर्त्सना केली. ती त्या स्वाभिमानी व पाणीदार पुरुषास सहन न होऊन त्यानें त्याच्या नौकरीचा राजीनामा दिला, आणि खुद्द बादशहाकडे जाऊन त्याच्या खास रिसाल्याचें आधिपत्य मिळविलें. फरुखसियर बादशहाचे कारकीर्दींत सय्यद अबदुल्लाखान व सय्यद हुसेनअल्ली ह्या दोन बंधूंचें विशेष प्राबल्य होऊन, ते करतील ती पूर्वदिशा, असा प्रकार झाला होता. त्यांचें वर्चस्व बादशहास असह्य होऊन त्यानें सय्यदबंधूंचे प्रतिस्पर्धी चिनकिलिचखान व राजा सवाई जयसिंग ह्यांस अनुकूल करून घेऊन स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला. परंतु तो फार भित्रा व चंच-

लवृत्ति असल्यामुळें त्यास यश न येऊन तो व्यर्थ प्राणांस मात्र मुकला. सय्यदबंधूंनीं फरुखसियर बादशहाचा वध केल्यानंतर दिल्लीच्या गादीवर रफिउद्दरजात व रफिउद्दवला अशा दोन अल्पवयी मुलांस अनुक्रमें संस्थापित केलें, परंतु तीं अल्प काळांत मृत्यु पावलीं. तेव्हां त्यांनीं रोषनअखत्यार ह्यास महमदशहा हें नांव देऊन दिल्लीच्या तक्तावर आरूढ केलें. अशा रीतीनें दिल्लीदरबारांत एकसारखी राजक्रांति सुरू होऊन सय्यदबंधूंची सत्ता अमर्यादित झाल्यामुळें सर्व लोकांस त्यांचा तिरस्कार वाटूं लागला आणि प्रांतोप्रांतीं बंडें उत्पन्न होऊं लागलीं. तीन बादशहांची जी दुर्दशा झाली तशीच महमदशहाची होणार असें समजून त्याच्या चतुर आईनें सय्यदबंधूंचा निःपात करण्याचा विचार चालविला. एकंदर अमीर उमराव व इतर दरबारी लोक सय्यदबंधूंच्या विरुद्ध झाल्यामुळें हा विचार सिद्धीस नेण्यास फारशी अडचण पडली नाहीं. ह्या कामीं सादतखान ह्यानें महमदशहास व त्याच्या आईस योग्य सल्लामसलत देऊन दिल्लीदरबारांतील सूत्र बिघडूं दिलें नाहीं. चिनकिलिचखान जो पुढें निजामउल्मुल्क या नांवानें इतिहासप्रसिद्ध झाला तो ह्या वेळीं माळव्याचा सुभेदार होता. त्यानें बंड करून अशीरगड व बऱ्हाणपूर ह्या बळकट जागा बळकाविल्या व सय्यदबंधूंचे सेनापति दिलावरखान व अलमअल्ली यांना ठार मारिलें. ही बातमी समजतांच सय्यदबंधूंनीं त्याचा पराभव करण्याकरितां बादशहासह एकानें तिकडे जावें व एकानें दिल्लीस रहावें असा निश्चय केला. इतक्यांत सय्यद हुसेनअल्ली ह्याचा पालखीमध्यें आकस्मिक खून झाला. त्यामुळें सय्यदअबदुल्ला ह्यास, त्यांत महमदशहाचें अंग आहे असें वाटून, त्यानें दुसरा एक नवीन बादशहा गादीवर बसवून महमदशहावर चाल केली. महमदशहास सय्यदबंधूंच्या प्रतिबंधांतून मुक्त होण्याची

इच्छा असल्यामुळें त्यानें त्यांच्या प्रतिस्पर्धी लोकांस अनुकूल करून घेतलें होतें. त्यामुळें बादशहाचें व अबदुल्लाखानाचें दिल्ली व आग्रा ह्यांच्या दरम्यान युद्ध झालें. त्यांत अबदुल्लाखानाचा पराभव होऊन त्यास अनेक जखमा लागल्या व शेवटीं तो बादशहाच्या कैदेंत सांपडून लवकरच मृत्यु पावला. ही गोष्ट इ० स० १७२०–२१ मध्यें घडली.

महमदशहास विजय प्राप्त झाल्यामुळें दिल्लीच्या लोकांस फार आनंद झाला व त्यांनीं बादशहाचा नगरांत प्रवेश होतांच आनंदोत्सव करून त्यावर सुवर्णपुष्पें व मौक्तिकें उधळिलीं. बादशहासही विशेष संतोष झाला व त्यानें आपणास स्वातंत्र्य मिळवून देण्याचे कामीं मदत केलेल्या लोकांचे उपकार मानून त्यांचा योग्य गौरव केला. त्या वेळीं त्यानें चिनकिलिचखान ह्यास 'असफजहा' असा किताब दिला व त्याच्या बरोबरीनें ज्यानें उत्कृष्ट साहाय्य केलें तो दुसरा इसम महमद अमीन ऊर्फ सादतखान ह्यास 'बहादुरजंग बऱ्हाणउल्मुल्क' अशी पदवी दिली, आणि त्याच्या पराक्रमाबद्दल एक मत्स्यचिन्ह सादर केलें. 'सियारउल्मुताखरीन' ग्रंथामध्यें असें लिहिलें आहे कीं, मोंगल लोकांमध्यें तरवारबहादुरीचें मुख्य चिन्ह मासा हें असे. तें ज्यास मिळे त्याच्या वीर्यशालित्वाची सीमा झाली असें मानीत असत. त्याप्रमाणें पाहिलें तर सादतखान ह्यानें आपलें पराक्रमतेज चांगलेंच व्यक्त केलें असावें असें सिद्ध होतें. महमदशहानें सादतखान ह्यास नुसतें महत्पद देऊन संतुष्ट केलें नाहीं, तर त्यास ह्याच वेळीं म्हणजे इ० स० १७२० मध्यें आग्र्याचा सुभेदार केलें व पुढें कांहीं वर्षांनीं म्हणजे इ० स० १७२४ मध्यें अयोध्येचा सुभेदार नेमिलें.*

* सादतखान ह्यास अयोध्येचा सुभेदार कोणत्या सालीं नेमिलें याबद्दल बरीच शंका आहे. मि. आयर्विन हे सादतखान ह्यास इ० स० १७२० मध्यें अयो-

सादतखान हा राजकारणपटु व धूर्त असल्यामुळें त्यानें अकबराबाद सुभ्याचा चांगला बंदोबस्त केला. त्यानें तेथील हिंदुप्रजेशीं मिळून मिसळून वागून सर्व दंगेधोपे नाहींसे केले, व देशांत शांतता ठेवण्याचा प्रयत्न केला. आग्रा येथें त्याचा राय नीलकंठ नागर म्हणून एक हिंदु दिवाण होता. तो फार हुशार असल्यामुळें त्यानें स्वतःस अयोध्येची सुभेदारी मिळाल्यानंतर त्यास आपल्या वतीनें आग्र्याच्या सुभ्यावर नेमिलें. परंतु राय नीलकंठ ह्यांस तेथील एका जमीनदारानें लवकरच ठार मारिलें. त्यामुळें दिल्लीचा वजीर खानदौरान ह्यानें राजा अजीतसिंग ह्यास आग्र्याचा सुभेदार केलें.

सादतखान अयोध्येचा सुभेदार झाल्यानंतर दिल्लीदरबारांत अनेक महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. त्या सर्वांमध्यें त्याचें अंग असे. तो वारंवार दिल्ली येथें बादशहाच्या मुलाखतीस व राजकारणप्रसंगास जात असे. दिल्लीचे प्रमुख वजीर खानदौरान, व कमरुद्दीनखान ह्यांचें व त्याचें चांगलें रहस्य होतें. त्यामुळें ते वेळोवेळीं राजकारणांत त्याची सल्लामसलत व साहाय्य घेत असत. इ० स० १७३४–३९ मध्यें कोरा प्रांताच्या जमीनदारानें प्रमत्त होऊन तेथील सुभेदार जाननिसरखान ह्याच्या विरुद्ध बंड केलें व दिल्लीहून त्याच्या मदतीस गेलेल्या सरदारास तो आटोपेनासा झाला. त्या वेळीं वजीर कमरुद्दीनखान ह्यानें सादतखानास मदतीस बोलाविलें व बाद-

---

ध्येचा सुभेदार नेमिलें असे म्हणतात. मि. बील हे इ० स० १७२४ मध्यें राजा गिरिधराच्या मागून सादतखान यास अयोध्येची सुभेदारी दिली असें लिहितात व 'सियारउल्मुताखरीन' ग्रंथामध्यें त्यास आधार सांपडतो. त्यावरून प्रारंभीं इ० स० १७२० मध्यें सादतखान ह्यास आग्रा ऊर्फ अकबराबाद येथील सुभा मिळाला व मागाहून इ० स० १७२४ मध्यें अयोध्येची सुभेदारी मिळाली असें दिसतें.

शाहतीचा व मुसलमानी धर्माचा कांहीं अभिमान असेल तर ह्या वेळीं त्या जमीनदाराची खोड मोडावी अशी त्यास आग्रहाची विनंति केली. सादतखानानें तीस मान देऊन त्या जमीनदाराशीं स्वतः युद्ध केलें व त्यास आपल्या शरसंधानानें चीत करून त्यास हस्तगत केलें. त्यानें त्याचें शीर बादशहास नजर पाठवून, धड वजीर कमरुद्दीनखान ह्यास बक्षीस केलें. त्यानें स्वतः ता० १२ नोव्हेंबर इ० स० १७३५ रोजीं बादशहाची भेट घेतली आणि त्यास १००९ मोहरा नजर करून त्यास एक सुंदर तलवार अर्पण केली. सादतखानाच्या रणशौर्यानें बादशहास फार समाधान वाटून त्यानें त्यास एक बहुमूल्य झगा, रत्न-खचित तलवार, एक घोडा व एक हत्ती बक्षीस दिला. ह्याप्रमाणें बादशहाची त्याजवर फार मेहेरबानी जडली होती.

महमदशहाच्या कारकीर्दीमध्यें मराठे अधिक अधिक प्रबल होऊन उत्तरेकडील प्रांत काबीज करीत होते. त्या वेळीं बादशाही वजिरां-मध्यें व निरनिराळ्या सुभेदारांमध्यें मत्सर व द्वेष फार वाढला अस-ल्यामुळें ह्यांस अधिक अधिक प्रवेश करण्यास संधि मिळत असे. ह्या वेळीं मराठ्यांच्या गादीवर छत्रपति शाहूमहाराज हे असून त्यांचें प्रधानपद थोरले बाजीराव पेशवे यांजकडे होतें. त्यांना मराठी राज्याचा झेंडा सर्व हिंदुस्थानभर फडकविण्याची महत्त्वाकांक्षा व उमेद होती. त्यांनीं राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर व पिलाजी जाधव ह्या शूर सरदारांस बरोबर घेऊन उत्तरेकडे स्वाऱ्या केल्या. त्या वेळीं मराठ्यांचा मोहरा मागें हटविण्याकरितां सादत-खान ह्यानें कित्येक वेळां त्यांच्याशीं चांगल्या लढाया केल्या व मरा-ठ्यांस पुष्कळ अडथळा केला. थोरले बाजीराव ह्यांनीं इ० स० १७३६ मध्यें जी दिल्लीवर स्वारी केली, त्या वेळीं सादतखान आग्र्यास असून तो प्रबळ होता व त्याचा पराभव करणें बरेंच कठीण होतें. म्हणून

त्यांनीं आग्र्याचा रोंख सोडून देऊन दिल्लीकडे मोर्चा वळविला व दिल्लीशहर जाळलें असें मराठी इतिहासावरून दिसून येतें. बाजीराव पेशव्यानीं ह्या हकीकतीचें एक पत्र चिमणाजी आप्पास लिहिलें आहे. तें महत्त्वाचें असून त्यांत सादतखानासंबंधानें लिहिलेला मजकूर वाचनीय आहे. बाजीराव लिहितातः—"सादतखानाचें युद्ध होऊन सरदार आलियाचें....वर्तमान कळलेंच असेल. सादतखान यमुना उतरोन आगरियास आला. त्यासी गांठ घालावी तरी तो आगरियाचा आसरा करून राहिला. तेथें जाऊन युद्ध करावें तरी तो आश्रियाचा असतां मोडेल कळतच आहे! जरी गंभीर यमुनेच्या संगमीं दिल धरून रहावें तरी........खळ्या फार. खानडवरा, महमदखान बंगस एक जालिया मनसबा भारी पडेल. याजकरितां संगमीं राहणें उत्तम नव्हे. दुसरें, सादतखानानीं पादशहास व खानडवरा व कमरदीखान वगैरे अमिरांस लेहून पाठविलें कीं, "मराठ्यांची फौज यमुना उतरोन आली होती ते बुडविली. दोन हजार स्वार मारिले, व दोन हजार नदींत बुडाले. मल्हारजी होळकर व विठोबा बुळे कामास आले. बाजीराव याची धाड आली होती तिची गत हे जाहली. त्याचे फौजेंत बाकी राहिली नाहीं. आपण यमुना उतरोन मराठे बुडवून चमेली पार करितों." म्हणून कित्येक गप्पा लिहून पाठविल्या. पादशहासी मजुरा करून घेतला. पादशहानीं खुशाली करून सादतखानास वस्त्रें व मोत्यांची माळ व हत्ती व शिरपांव दिला. आपली बाजू सर करून घेतली....... तात्पर्यार्थ, आमचे फौजेंत जीव नाहीं; केवळ निर्जीव; बुडवून नेस्तनाबूत केली असें लिहीत. मोंगली कारभार आपण ऐकत जाणतच आहेत. करावें थोडें, लिहावें फार. पादशहास सत्य भासलें तें मिथ्या केलें पाहिजे. त्याचे विचार दोन. एक सादतखानास बुडवावें, किंवा दिल्लीचें पूर जाळावें;

तेव्हां मिथ्या होईल. त्यास **सा**दतखान **आ**गरें सोडीनातसें देखोन आह्मीं **दि**ल्लीस जावयाचा निश्चय केला."* ह्यावरून **सा**दतखान सामर्थ्यवान असून बढाई मारणाराही होता असें व्यक्त होतें.

ही **म**राठ्यांची मोहीम झाल्यानंतर पुढें तीन वर्षांनीं **इ**राणचा बादशहा प्रसिद्ध **ना**दिरशहा ह्यानें **हिं**दुस्थानावर स्वारी केली. त्या वेळीं **ना**दिरशहास **दि**ल्लीवर चाल करून येण्याबद्दल **नि**जामउल्मुल्क व **सा**दतखान ह्यांनीं पाचारण केलें असा लोकप्रवाद आहे. ह्या उभयतांचा परस्परांविषयीं मत्सर असून **दि**ल्लीदरबारांत आपला पगडा बसावा अशी प्रत्येकाची इच्छा होती. ह्याच सुमारास वजीर **खा**नदौरान **अ**मीर **उ**ल्उमरा हा मृत्यु पावल्यामुळें त्याची जागा रिकामी झाली होती. ती आपणास मिळावी म्हणून **सा**दतखानाची फार मनीषा होती, व **नि**जामउल्मुल्काचाही तिच्यावर डोळा होता. तेवढ्याकरितां **सा**दतखानानें **ना**दिरशहाशीं सख्य जुळवून त्यास बादशहाकडून दोन कोटी रुपये देववितों असें कबूल केलें; व इकडे बादशहास सांगितलें कीं, **ना**दिरशहास दोन कोटी रुपये दिले असतां तो स्वदेशीं जाण्यास तयार आहे. बादशहानें **नि**जामउल्मुल्क यास **ना**दिरशहाकडे मध्यस्तीस पाठविलें. **नि**जामउल्मुल्क याची व **ना**दिरशहाची भेट झाली. त्यानें दोन कोटी रुपये दिल्यास बादशहाशीं स्नेह जोडून स्वदेशीं परत जाण्यास आपण तयार आहों असें कबूल केलें. **नि**जामउल्मुल्क मोठ्या आनंदानें बादशहाकडे आला व त्यानें झालेला वृत्तांत त्यास सादर केला. तो ऐकून बादशहा फार खुष झाला व त्यानें त्यास 'अमीर उल्-उमरा' हें पद अर्पण केलें. नंतर बादशहाची व **ना**दिरशहाची मोठ्या समारंभानें भेट झाली. **ना**दिरशहानें त्याचें अत्यंत सन्मानपूर्वक स्वागत केलें. रीतीप्रमाणें त्यांचें स्नेहभावाचें संभाषण होऊन

* थोरले **बा**जीराव **पे**शवे याचे अस्सल पत्र—**धा**वडशीं दप्तर.

बादशहा आपल्या डेऱ्यांत परत आला. इकडे सादतखानास झालेला वृत्तांत समजला व त्यास आपला इष्ट हेतु सिद्धीस गेला नाहीं असें पाहून पराकाष्ठेचें वाईट वाटलें. त्यानें नादिरशहाची मुद्दाम भेट घेऊन त्यास असें सांगितलें कीं, "दोन कोट रुपये म्हणजे कांहींच नव्हत. तेवढी रक्कम मी एकटा स्वतःच्या खाज़गींतून देईन. खुद्द बादशहाजवळ व दिल्लींतील लोकांजवळ अगणित संपत्ति आहे. आपण तेथपर्यंत चला मात्र, कीं तेथें द्रव्याच्या राशीच्या राशी सांपडतील. दिल्ली शहर येथून* अवघें ४० कोस आहे." हें सादतखानाचें भेदक व गुप्त भाषण ऐकून नादिरशहास क्रोध उत्पन्न झाला. त्यानें लगेच आपला पूर्वीचा विचार रद्द करून दिल्लीवर चाल केली. तेथें झालेली भयंकर कत्तल व अगणित लूट ह्यांचा वृत्तांत इतिहासवाचकांस पूर्ण अवगत असल्यामुळें त्याचें पुनर्विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं.

नादिरशहास निजामउल्मुल्क व सादतखान हे दोघेही वस्ताद आहेत असें वाटून त्यानें दोघांसही कैद केलें, व दोघांचाही छल करून त्यांच्याकडून सांपडेल तितकी संपत्ति लुटून घेतली. निजामउल्मुल्कानें सादतखानाचा समूळ नाश व्हावा एवढ्याकरितां, त्याजजवळ, "इतका अपमान झाल्यानंतर लाजिरवाणें जिणें चांगलें नव्हे, त्यापेक्षां प्राण गेलेला बरा!" असे कपटप्रचुर शब्द उच्चारून उभयतांनीं विषप्राशन करावें असा हेतु दर्शविला. - सादतखान अगदीं खिन्न व मरणप्राय झाल्यामुळें त्यानें त्यास आपली अनुमति तेव्हांच दिली. निजामउल्मुल्कानें विषाचे दोन पेले तयार करविले. त्यांपैकीं एकांत खरें विष घातलें व एकामध्यें नुसतें विष

* बादशहाची व नादिरशहाची भेट दिल्लीच्या उत्तरेस कर्नाल येथें झाली होती. तेथील ही हकीकत आहे.

्याचें मिष केलें. ह्यांपैकीं पहिला **सादतखानास** दिला व
ा आपण घेतला. अर्थात् त्याचा परिणाम एकावर होऊन एक
जगांतून नष्ट झाला व दुसरा राजकीय उलाढाली करण्यास
कायम राहिला. ही गोष्ट **एल्फिन्स्टन**प्रभृति इतिहासकारांनीं
आहे, परंतु तिच्या सत्यत्वाबद्दल वाद आहे. मि० **बील**
ा **सादतखानाच्या** मृत्यूची तारीख ९ मार्च इ० स० १७३९
दिली आहे. तिच्यावरून **सादतखान** हा **नादिरशहाच्या** दंग-
मृत्यु पावला ही गोष्ट सिद्ध आहे. **सादतखानाची** कबर
ोस आहे.

**सादतखान** ह्यास फक्त एक कन्या होती. ती त्यानें आपल्या
चा मुलगा **महमद मुकीम** ह्यास दिली होती. हाच पुरुष त्याच्या
त् नबाब **मनसूरअली सफदरजंग** ह्या नावानें अयोध्येच्या गादीचा
पति झाला. **सादतखान** मृत्यु पावला तेव्हां त्याजवळ अतिशय
त होती. **सर हेन्री लॉरेन्स** ह्यांनीं **सादतखानाबद्दल** असें लिहिलें
कीं:—"त्यानें इतकी संपत्ति मिळविली परंतु त्यानें कोणावर जुलूम
नाहीं. उलट त्यानें गरीबांचा प्रतिपाल चांगल्या रीतीनें केला व
त लोकांपासून मात्र द्रव्य मिळविलें. त्यानें प्रमत्त झालेल्या
नदार लोकांची सत्ता कमी करून आपला एकछत्री अंमल बस-
. परंतु सदसद्विवेकशक्तीचा अंमल त्याच्यावर मुळींच नव्हता.
ुंबाचा उत्कर्ष हाच त्याचा मुख्य हेतु असल्यामुळें, त्यानें तो
ास नेण्याचे कामीं, कृतज्ञता, राजनिष्ठा अथवा देशाभिमान ह्या
चा मुळींच विचार केला नाहीं. त्याचा स्वतःचा प्रांत सुरक्षित
ला म्हणजे पुरे. मग इराणी अथवा **मराठे** ह्यांनीं **दिल्लीच्या**
ज्याचा नाश केला तरी त्यास त्याची काळजी नव्हती. **दिल्लीचा**
ाहा बलहीन असल्यामुळें त्यानें त्याशीं नम्रपणाचें वर्तन ठेविलें

नाहीं. त्यानें 'द्यावें तसें घ्यावें' ह्या न्यायानें ज्या कृति केल्या त्यांचीं फळें त्यास चांगलीं मिळालीं. त्याच्या कर्तृत्वशक्तीमुळें व सुव्यवस्थित राज्यपद्धतीमुळें त्यास स्वतंत्र राज्य प्राप्त झालें, परंतु त्याच्या अप्रामाणिकपणामुळें त्यास अकालिक व अपकीर्तिकर मृत्यु प्राप्त झाला. तात्पर्य, जे दुसऱ्यास आपल्या कपटजालांत ओढण्याचा यत्न करितात ते स्वतःच फसतात, ह्या नियमास सादतखान अपवाद नव्हता."

हे सर हेन्री लॉरेन्स ह्यांनीं सादतखानासंबंधानें काढलेले उद्गार अगदीं यथार्थ आहेत. सादतखान अयोध्या व लखनौ ह्या दोन ठिकाणीं राहत असे. त्यानें अयोध्या येथें एक किल्ला बांधला होता आणि लखनौ येथें लिकना नामक जो किल्ला होता तो दुरुस्त करून व त्यांत सुंदर राजवाडा बांधून त्यास 'मत्स्यीभवन' असे नांव दिलें होतें. हा किल्ला व त्यांतील राजवाडा अलीकडे पाडला गेला आहे. मत्स्य हे अयोध्येच्या नबाबाचें राजचिन्ह असून तें सादतखान शिरपेंचावर धारण करीत असे. तें कसें प्राप्त झालें हें वर सांगितलेंच आहे. सादतखान ह्याचें चरित्र एकंदरींत बोधपर आहे.



**MANSUR ALI-SAFDAR-JUNG.**

मनसूरअळी सफद्रजंग.

(इ० स० १७३९—इ० स० १७५४)

# भाग ३ रा.



## मनसूरअल्ली सफदरजंग.

(इ० स० १७३९–इ० स० १७५४.)

सादतखान मृत्यु पावल्यानंतर त्याचे दोन पुतणे शेरजंग व सफदरजंग ह्यांनीं नादिरशहास अयोध्येची सुभेदारी देण्याबद्दल अर्जी केली. नादिरशहानें सफदरजंग हा सादतखानाचा जांवई आहे असें पाहून व त्याजकडून २० लाख रुपये नजर घेऊन त्यास दिल्लीच्या बादशहाकडून अयोध्येची सुभेदारी देवविली. सफदरजंग ह्याचें मूळचें नांव मिर्झा महमद मुकीम असें होतें. त्यास सुभेदारी मिळाल्यानंतर त्यानें मनसूरअल्ली सफदरजंग हें नांव धारण केलें. ह्याच नांवानें तो इतिहासांत प्रसिद्ध आहे.

सफदरजंग हा फार बुद्धिमान् व चतुर मुत्सद्दी होता. त्यानें अयोध्येची सुभेदारी मिळतांच दिल्लीच्या बादशहाशीं व दरबारचे वजिराशीं सख्य ठेवून अयोध्येची राज्यव्यवस्था उत्तम प्रकारें करण्यास सुरवात केली. हा हिंदु लोकांवर फार प्रेम करीत असे. ह्यानें आपल्या पदरीं हुशार व स्वकर्तव्यदक्ष असे मोठमोठे हिंदु लोक निरनिराळ्या अधिकारांवर ठेविले होते. ह्याचा दिवाण राजा नवलराय म्हणून एक कायस्थ जातीचा गृहस्थ होता. तो राजकार्यधुरंधर असल्यामुळें पुढें फार प्रसिद्धीस आला. सफदरजंग ह्यानें फैजाबाद येथें आपली राजधानी केली होती. ह्याच्या कारकीर्दींत दिल्लीदरबारांत अनेक घडामोडी झाल्या. त्यामुळें त्यास स्वस्थपणानें अयोध्याप्रांतांत राहण्यास फारशी संधि सांपडली नाहीं. बहुतकरून तो दिल्लीस अथवा निरनिराळ्या ठिकाणीं स्वारीमध्यें

राहत असे. ह्याच्या कारकीर्दीमध्यें रोहिल्यांचा उत्कर्ष व त्यांच्याशीं युद्धें, अहमदशहा अबदाल्ली अथवा दुराणी ह्याच्या उत्तरेकडील स्वाऱ्या, फरुकाबादचे नबाब ह्यांचे पुंडावे व त्यांशीं युद्ध, आणि मराठ्यांचा रोहिलखंडांत प्रवेश ह्याच मुख्य गोष्टी घडून आल्या. त्याची संक्षिप्त हकीकत येथें सादर करणें अवश्य आहे.

रोहिले म्हणजे मूळचे अफगाण लोक. हे १८ व्या शतकाच्या प्रारंभीं हिंदुस्थानांत आले व हळू हळू मोंगल सुभेदारांच्या साहाय्यानें जेथें आश्रय मिळेल तेथें वसाहत करूं लागले. रोहिलखंड म्हणून जो प्रांत सध्या प्रसिद्ध आहे त्याचें पूर्वीचें नांव कठेर (Katehr) असें होतें. रोहिले लोकांनीं तेथें वसाहत करून तो प्रांत बळकाविल्यामुळें त्यास पुढें रोहिलखंड असेंच नांव पडलें. रोहिल्यांचा मुख्य पुढारी अल्ली महमद नामक एक धाडसी व शूर पुरुष होता. ह्यानें नादिरशहाच्या स्वारीमुळें व दिल्लींतील प्रमुख मुत्सद्यांच्या आपसांतील वैमनस्यामुळें मोंगल बादशाहीचा कमजोर झालेला पाहून आपला अंमल बिजनोर, मुरादाबाद वगैरे प्रांतामध्यें हळू हळू संस्थापित करण्यास सुरवात केली. ह्याचे पदरीं अफगाण सैन्य बरेंच होतें. त्याच्या साहाय्यानें त्यानें इ० स० १७४० मध्यें रोहिलखंडाचा बहुतेक भाग काबीज केला; आणि दिल्लीच्या निर्बल बादशहाची मर्जी संपादन करून त्या प्रांताची सुभेदारी मिळविली. इ० स० १७४० पासून इ०स० १७४९ पर्यंत रोहिलखंडावर त्याची स्वतंत्र सत्ता चालत होती. पुढें ती वाढविण्याची त्यास अनावर इच्छा झाल्यामुळें त्यानें अयोध्या प्रांतामध्यें लूटमार व दंगेधोपे करण्यास प्रारंभ केला. ही गोष्ट तेथील नबाब सफदरजंग ह्यास अर्थातच रुचली नाहीं. त्यानें त्यास बऱ्या बोलानें ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला; परंतु तो निष्फल झाला. तेव्हां त्यानें दिल्लीस जाऊन, वजीर कमरुद्दीनखान

ह्याच्या मदतीनें, खुद्द बादशहाकडून त्याजवर स्वारी करविण्याचा निश्चय केला. सफदरजंग याचें दिल्लीदरबारांत चांगलें वजन होतें, त्यामुळें त्याचा उद्देश तत्काळ सिद्धीस गेला. रोहिल्यांचा पुढारी अल्ली महमद हा इतका शिरजोर झाला कीं, त्यानें बादशाही खंडणी देण्याचें अमान्य केलें व दिल्लीदरबारांतून दिवाण हिरानंद म्हणून जो अंमलदार गेला होता त्याचें त्यानें पारिपत्य केलें; त्यामुळें त्याच्या अपराधाची आणखी भर पडली. महमदशहा बादशहा व त्याचा कमरुद्दीनखान वजीर ह्या उभयतांनीं अयोध्येचा नबाब मनसूरअल्ली सफदरजंग व फरुकाबादेचा नबाब काइमखान बंगष ह्या उभयतांची मदत घेऊन इ० स० १७४६ मध्यें रोहिल्यांवर स्वारी केली. रोहिल्यांची व बादशाही सैन्याची बाणगड येथें लढाई झाली. तींत त्यांचा फार पराभव होऊन सफदरजंगाचा दिवाण नवलराय ह्याच्या मार्फतीनें त्यांचा पुढारी अल्ली महमह ह्यानें तहाचें बोलणें लाविलें. परंतु ह्या वेळीं काइमखान बंगष ह्यानें, मत्सरबुद्धीनें, आपण होऊन, त्याची व बादशहाची मुलाखत करून दिली; आणि सफदरजंगाच्या इच्छेविरुद्ध त्यानें त्याशीं सख्य करून त्यास बादशहाकडून सरहिंद प्रांताचा सुभा देवविला. त्यामुळें काइमखान बंगष ह्याचें व सफदरजंग ह्याचें कायमचें वैमनस्य पडलें. सर जॉन स्ट्रॅची ह्यांनीं आपल्या "रोहिला वॉर" नामक पुस्तकांत, अल्ली महमद ह्यास बादशहानें कैद करून दिल्लीस नेलें व पुढें त्याच्या जातभाईच्या वजनामुळें त्यास सरहिंदचा सुभा देऊन मुक्त करणें त्यास भाग पडलें म्हणून लिहिलें आहे. ते जातभाई फरुकाबादचे बंगष पठाण हेच असावेत. ह्याच पठाणांनीं पुढें रोहिल्यांचा पक्ष घेऊन सफदरजंगास फार त्रास दिला.

अल्ली महमद शरण आल्यामुळें रोहिल्यांचें युद्ध कांहीं कालपर्यंत बंद राहिलें व त्याबरोबर सफदरजंगाची इच्छा पूर्ण न होतां तीही

तशीच कायम राहिली. पुढें लवकरच—म्हणजे इ० स० १७४८ मध्यें अहमदशहा अबदाली याची हिंदुस्थानावर स्वारी झाली. त्यामुळें दिल्ली-पतीचें व सफदरजंगादि प्रमुख सरदारांचें लक्ष्य तिकडे लागलें.

इ०स० १७४८ च्या जानेवारी महिन्यामध्यें अहमदशहा अबदाली—ज्याचें नांव पानिपतच्या घनघोर रणसंग्रामामुळें महाराष्ट्राच्या इतिहासांत लाल रक्तानें लिहिलें गेलें आहे—तो प्रचंड सैन्यानिशीं हिंदुस्थानावर चालून आला. ह्यानें हिंदुस्थानावर एकंदर चार स्वाऱ्या केल्या. त्यापैकीं ही त्याची पहिली स्वारी होय. तो प्रथमतः लाहोरास आला. तेथें त्यास लाहोरचा सुभेदार शहानिवाजखान ह्यानें अटकाव केला; परंतु त्यानें त्याशीं युद्ध करून त्याचा पराभव केला. तेव्हां तो पळून दिल्लीस आला. तो दिल्लीस आल्यानंतर बादशहास मोठें संकट पडलें. नंतर त्यानें वजीर कमरुद्दीनखान, मनसूरअल्ली सफदरजंग, सलाबतजंग, सवाई जयसिंगाचा पुत्र महाराज इस्त्रीसिंगप्रभृति मुख्य मुख्य अमीरउमरावांस एकत्र करून व आपला मुलगा अहमदशहा ह्यास सैन्याचें आधिपत्य देऊन इ० स० १७४८ च्या जानेवारी महिन्यांत अबदालीवर पाठविलें. ह्या वेळीं रोहिला अल्ली महमद हा सरहिंदचा सुभेदार होता व त्याजवळ वीस हजार सैन्य तयार होतें. तेव्हां तो कदाचित् अबदालीस वश होईल म्हणून बादशहानें त्यास रोहिलखंडाची सुभेदारी देऊन पुनः तिकडे पाठविलें. इकडे अहमदशहा अबदाली आपणास रोहिल्यांचें साहाय्य मिळेल ह्या उद्देशानें सरहिंदपर्यंत चालून आला. तों त्याच सुमारास बादशाही सैन्य तेथें जाऊन पोहोंचलें. उभय सैन्यांची तेथें लढाई होऊन त्यांत कमरुद्दीनखान वजीर मारला गेला. परंतु त्याचा मुलगा मोईन-उल्मुल्क ऊर्फ मीरमनू ह्यानें धैर्य न सोडतां सफदरजंगादि योद्धयांच्या मदतीनें अबदालीचा पराभव केला. त्यामुळें तो

हताश होऊन अल्ली महमद रोहिल्याचे अब्दुल्ला व सयदुल्ला असे दोन पुत्र बरोबर घेऊन कंदाहारास परत गेला. ह्या पराक्रमाबद्दल मीरमनू ह्यास लाहोर व मुलतान येथील सुभेदारी मिळाली. हें यशस्वी सैन्य सफदरजंगासहवर्तमान दिल्लीस आलें. परंतु तें तेथें येण्यापूर्वींच, महमदशहा बादशहा मृत्यु पावला. त्यामुळें सर्व लोकांचा विजयोत्सव कमी होऊन सर्वांस फार दुःख झालें.

महमदशहाच्या मागून त्याचा मुलगा अहमदशहा हा ता० १९ एप्रिल इ० स० १७४८ रोजीं सिंहासनारूढ झाला. त्यानें पूर्वींचा वजीर कमरुद्दीनखान हा सरहिंदच्या लढाईंत मारला गेल्यामुळें नबाब मनसूरअल्ली सफदरजंग ह्यास 'वजीर' हें महत्पद दिलें. मनसूरअल्ली ह्यास ह्या पदाची फार दिवसांपासून लालसा होती. ती सफल झाली त्यामुळें 'अमृतं राजसन्मानम्' ह्या म्हणीप्रमाणें त्यास अत्यंत आनंद झाला. ह्याच वेळेपासून अयोध्येच्या नबाबास 'नबाबवजीर' हें संयुक्त पद प्राप्त झालें. मनसूरअल्लीस वजिरी प्राप्त झाल्यानंतर दिल्ली-दरबारांत त्याचें अतिशय वजन वाढलें व त्याच्या आज्ञेप्रमाणें सर्व राज्यकारभार होऊं लागला.

ह्याच सुमारास दुसरी एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. सफदरजंगाचा पूर्वींचा शत्रु व रोहिल्यांचा नायक अल्ली महमद हा ता० १६ माहे सप्तंबर इ० स० १७४८ रोजीं मृत्यु पावला. ह्यास अहमदशहा दुराणीच्या स्वारीमुळें पुनः रोहिलखंडाची सुभेदारी प्राप्त झाली होती हें वर सांगितलेंच आहे. त्यानें लागलीच संधि साधून रोहिलखंडाचा सर्व भाग आपल्या ताब्यामध्यें घेतला व प्रत्येक ठिकाणीं पठाण अधिकाऱ्यांची योजना करून सर्व प्रांत स्वतंत्र करण्याचा यत्न चालविला. त्यानें बरेली जिल्ह्यामध्यें औनला ( Aonla ) येथें आपली राजधानी केली, आणि आपणास स्वतंत्र सुभेदार म्हणवून

आपल्या नांवानें राज्यकारभार चालविला. तों इतक्यांत त्याजवर काळाची नजर पोहोंचून तो इहलोकांतून नष्ट झाला. त्यास सहा पुत्र होते. त्यांपैकीं दोघे वडील पुत्र अबदाल्लीनें आपल्या बरोबर नेले होते व बाकीचे चार लहान होते, म्हणून त्यानें राज्याची सर्व व्यवस्था आपला भाऊ हाफिज रहिमतखान याजकडे सोंपविली होती, आणि त्यास मदतगार म्हणून आपला भाचा दुंडीखान ह्यास नेमिलें होतें. ह्या उभयतांनीं रोहिल्यांची सत्ता वाढविण्याचा एकसारखा यत्न केला. ह्यांचेच जोडीदार फरुकाबादचे बंगष पठाण हे असून ते मध्य दुआबामध्यें आपली सत्ता चालवीत होते. दोघांचें वर्चस्व अयोध्याप्रांतास विघातक होईल असें समजून तें समूळ नष्ट करण्याचा यत्न सफदरजंग ह्यानें केला, व त्या कामांत त्यानें मराठ्यांचें साहाय्य घेतलें. हाच मराठ्यांचा रोहिलखंडांतील मूळप्रवेश होय.

सफदरजंगानें प्रथमतः रोहिलखंडामध्यें दिल्लीच्या बादशहाकडून नवीन नवीन अधिकारी पाटवून तेथील रोहिले लोकांचें प्राबल्य कमी करण्याचा निश्चय केला. त्यानें कुतबुद्दीन नामक एका इसमास मुरादाबादेचा फौजदार नेमून तिकडे पाठविलें. त्यानें रोहिलखंडावर स्वारी केली. परंतु रोहिल्यांचा सेनापति दुंडीखान ह्यानें त्याशीं लढाई करून त्यास ठार मारिलें. तेव्हां सफदरजंगानें रोहिल्यांचें पारिपत्य करण्याकरितां त्यांच्यांत भेद करून त्यांची शक्ति नाहींशी करण्याची युक्ति योजिली. त्यानें फरुकाबादेचा नबाब काइमखान बंगष याचेकडून रोहिल्यांवर स्वारी करविली. त्याची व रोहिल्यांचे पुढारी हाफिज रहिमत आणि दुंडीखान यांची लढाई इ० स० १७५० मध्यें बदाऊनजवळ झाली. त्यांत काइमखान रोहिला मारिला जाऊन फरुकाबादच्या नबाबाचें बल कमी झालें. सफदरजंगास एक शत्रु आपोआप नाहींसा झाला असें वाटून त्यानें

त्याचा प्रांत लुटून तो अयोध्येमध्यें सामील केला, आणि त्याचा सर्व कारभार आपला दिवाण राजा नवलराय ह्याच्या हातीं देऊन आपण दिल्लीस गेला.

परंतु इकडे "कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें" ह्या वामन पंडितांच्या उक्तीप्रमाणें काइमखानाचा मुलगा अहमदखान ह्यास रोहिल्यांनीं पुनः उत्तेजन देऊन युद्धास प्रवृत्त केलें. ह्या वेळीं त्यास उत्तेजन येण्यास एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. अयोध्येचा दिवाण राजा नवलराय ह्याच्या नौकरांनीं एका पठाण स्त्रीचा कांहीं अपमान केला; म्हणून ती अहमदखानाकडे जाऊन म्हणाली कीं, "अहमदखान, तूं डोक्यावर पगडी कशास बाळगतोस? मजसारख्या पठाण स्त्रीचा काफिरांनीं तुझ्या समक्ष अपमान करावा त्यापेक्षां तुझें पुरुषत्व व्यर्थ आहे! ह्यापेक्षां तुझ्या बापास अल्लानें मुलगी दिली असती तर बरें झालें असतें!!" हे शब्द ऐकून त्यास आवेश उत्पन्न झाला. त्यानें अयोध्येच्या नबाबाच्या वतीनें फरुकाबाद येथें जो कोतवाल होता त्याचा शिरच्छेद करून व तें शहर हस्तगत करून तेथें आपला झेंडा उभारला, आणि राजा नवलराय ह्याशीं लढाई करून त्यास कालीनदी येथें ता० ३ आगष्ट इ० स० १७५० रोजीं ठार मारिलें. अशा रीतीनें अहमदखान बंगष यानें आपली गादी पुनः स्थापिली व सर्व रोहिले व आपण एक होऊन अयोध्या प्रांतावर स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. ही गोष्ट सफदरजंग वजीर ह्यास दिल्लीस कळतांच त्यानें सुरजमल्ल जाट ह्याचें सैन्य मदतीस घेऊन अहमदखानावर स्वारी केली. परंतु त्यामध्यें त्याचाच पराभव झाला व त्यास जखमा लागल्या, तेव्हां त्यास मोठ्या दुःखानें पळून जाणें भाग पडलें. त्याचा हत्ती नाहींसा होतांच सर्व सैन्यांत एकच गोंधळ झाला आणि तें वाटेल तिकडे

सैरावैरा पळूं लागलें. अशा रीतीनें सफदरजंगासारख्या वरिष्ठ वजिराचा पराभव केल्यामुळें पठाण व रोहिले विजयश्रीनें फुगून गेले व आतां सर्व अयोध्या प्रांताचे आपण अनियंत्रित धनी झालों असें मानून ते आनंदांत निमग्न झाले.

वजीर सफदरजंग ह्याचा पराभव झाला ही बातमी दिल्लीदरबारीं समजतांच, तेथें त्याचा मत्सर करणारे जे लोक होते त्यांनीं बादशहाचें मन कलुषित करून त्याला वजिरीवरून दूर करण्याचा प्रयत्न चालविला. ही गोष्ट सफदरजंगास समजतांच त्यानें प्रथम दिल्लीदरबारीं जाऊन बादशहाची भेट घेतली व त्यास आपल्या मोहक भाषणानें सुप्रसन्न केलें. त्या वेळीं त्यानें सादी कवीनें म्हटल्याप्रमाणें:—

बंदे हमान बे के झे तक्सीरे खीष,
उझ्र् बेदर्गाहे खुदा आवरद ;
वर्ने सझावारे खुदावंदीष,
कस् न तवानद के बजा आवरद.*

हें वाक्य म्हणून दाखवून बादशहाची क्षमा मागितली. बादशहास त्याचें भाषण ऐकून संतोष झाला व त्यानें त्यास क्षमा करून एक बहुमूल्य पोषाख, मोत्यांची कंठी, तलवार, व हत्तीघोडा बक्षीस दिला. ह्या वेळीं सफदरजंगानेंही बादशहास पंचवीस लक्ष रुपयांचा नजर-

---

* ह्याचा भावार्थ असा आहे कीं, ईश्वरविषयक कर्तव्य करण्यास ज्या अर्थी मनुष्य समर्थ नाहीं त्या अर्थी त्यानें आपले अपराध ईश्वराजवळ कबूल करून त्याची क्षमा मागावी हेंच त्यास योग्य आहे. ही कविता गुलिस्तान ग्रंथांतील असून ती सादीनें ईश्वराची ग्रंथारंभीं स्तुति करितांना लिहिलेली आहे. ही सफदरजंगानें बादशहाजवळ म्हणून दाखऊन तींत त्याची स्तुति कशी खुबीनें केली आहे हें रसिक वाचकांच्या तेव्हांच लक्ष्यांत येईल.

नजराणा सादर केला. येणेंप्रमाणें आपला पराभव झाला असतांही बादशहावर छाप ठेवून सफदरजंग दिल्लीहून रोहिल्यांचा व पठाणांचा समाचार घेण्यास अयोध्येकडे पुनः परत आला.

सफदरजंगास अयोध्याप्रांत आपल्या हातून गेला असें समजतांच त्यानें हरप्रयत्न करून तो मिळविण्याचा दृढ निश्चय केला. त्यानें ह्या प्रसंगीं मराठ्यांवाचून दुसरे कोणी साहाय्य करण्यास समर्थ नाहींत असें पाहून त्यांस मदतीस बोलाविलें. ह्या वेळीं मराठ्यांचे सरदार जयाप्पा शिंदे व मल्हारराव होळकर आपल्या सैन्यानिशीं जयपूर प्रांतीं होते. त्यांची व नबाब वजीर सफदरजंग ह्यांची भेट झाली. नंतर ते यमुना पार होऊन कादरगंजाजवळ आले. तेथें त्यांनीं पठाण सरदार दहा हजार फौजेसुद्धां बुडविला. नंतर अहमदखान पठाण प्रयाग प्रांतीं आसरा करून होता. तो फरुकाबादेस आला. तेव्हां मराठे सरदारांनीं आपलें बुणगें कोस दोन कोस ठेवून सडे फौजेनिशीं मोर्चेबंदी केली. उभयतांचें युद्ध एकसारखे २९ दिवस झालें. परंतु पठाणास रोहिल्यांचें साहाय्य असल्यामुळें त्यास गंगे-पलीकडून सामानसरंजाम पोहोंचत होतें. त्यामुळें ते लवकर जेरीस येईनात. तेव्हां मराठ्यांनीं, वजीर सफदरजंग आपल्या छावणीपा-सून पांच कोसांवर कनोजनजीक होता, त्याच्याकडून गंगेस नावांचा पूल बांधवून, निवडक फौजेनिशीं गंगापार होऊन, पठाणाची फौज रोहिलेसुद्धां तीस हजार होती तिशीं गांठ घालून, पठाण लुटून मारून फस्त केला. तेच दिवशीं रात्रीं अहमदखान पठाण पळून गेला. त्याचा पिच्छा करून त्यास बुडविला. दत्ताजी शिंदे यांणीं फार फार शर्त केली. हत्ती, घोडे, उंट, निशाणें सर्व लुटून आणिलीं.*

* ह्या पठाणयुद्धाच्या संबंधाचीं नंबर १६२, १६३ आणि ३६४ अशीं तीन पत्रें काव्येतिहाससंग्रहांतील "पत्रें यादी" मध्यें प्रसिद्ध झालीं आहेत. तीं फार

ह्या युद्धामध्यें मराठ्यांचें अलौकिक शौर्य व्यक्त होऊन त्यांचा अतिशय फायदा झाला. ह्या वेळीं मराठ्यांस रोहिलखंडांतील पुष्कळ लूट सांपडून सफदरजंगाकडून बराच पैसा प्राप्त झाला. सफदरजंगानें अहमदखान पठाण व रोहिले ह्यांच्यांशीं आपल्या इच्छेप्रमाणें तह करून आपला सर्व मुलूख त्यांच्या ताब्यांतून मुक्त केला. ह्या वेळीं त्यानें मराठे सरदारांस रोख पैसा किती दिला ह्याचा उल्लेख बरोबर सांपडत नाहीं. मि० आयर्व्हिन हे लिहितात कीं, सफदरजंग व मराठे ह्यांनीं पठाणाकडून अर्धा मुलूख व ३० लाख रुपये बादशाही खंडणी ठरवून घेतली. सर जॉन स्ट्रॅची लिहितात कीं, सफदरजंग ह्यानें रोहिल्यांकडून ५० लक्षांचे दस्तऐवज व ५ लक्ष रुपये प्रतिवार्षिक बादशाही खंडणी मान्य करून घेतली, व हेच दस्तऐवज मराठ्यांच्या स्वाधीन केले. होळकरांच्या कैफियतीमध्यें लिहिलें आहे कीं, सफदरजंगानें मराठ्यांस "कुचाचे लाख व मुक्कामाचे पन्नास हजार" येणेंप्रमाणें "पैसा कवडी कवडी चुकवून दिला". ह्यांपैकीं खरी गोष्ट कोणती ह्याचा बरोबर निर्णय करण्यास साधन नाहीं. तथापि ह्या पठाणयुद्धामध्यें खुद्द पेशव्यांस ९॥ लक्ष रुपयांचा प्रांत अंतर्वेदीमध्यें मिळाला व शिंदे होळकर ह्यांस ६॥ लक्षांचा प्रांत मिळाला, अशी माहिती मिळते. सफदरजंगानें मराठ्यांचे कृतोपकार स्मरून शिंदे होळकर ह्यांस दिल्ली येथें आपल्या बरोबर नेलें व तेथें बादशहाची व त्यांची मुलाखत घालून देऊन त्यांचा बहुमान केला. दिल्लीदरबारांत मराठ्यांची वाहवा झाल्यामुळें त्यांचें वजन उत्तर हिंदुस्थानांत विशेष वाढलें व त्यांच्या पुढील उत्कर्षास तें कारण झालें.

---

महत्त्वाचीं असून त्यांच्याच आधारानें वरील हकीकत लिहिली आहे. अस्सल आधार मिळाल्यानंतर मग इंग्रजी आधारांची त्यापुढें मातबरी नाहीं.

बाळाजी बाजीराव पेशवे यांस हें मराठ्यांच्या पराक्रमाचें संतोषवृत्त समजतांच त्यांनीं शिंदे होळकर ह्यांचें फार फार गौरव केलें. त्यांनीं हा एवढा बिकट मनसुबा सिद्धीस नेऊन "वजीर मोडला, पळाला असतां फिरोन फत्तेच्या मसनदीवर बसविला" आणि इराण तुराण-पावेतों लौकिक गाजविला, ह्याबद्दल त्यांस शाबासकी दिली. ह्या संबंधानें बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं जयाजी शिंदे ह्याच्या पत्रांत काढलेले उद्गार हृदयाल्हादक आहेत. ते लिहितातः—"तुह्मी एक-निष्ठ सेवक, उमदीं उमदीं कामें दूरंदेशीनें मनांत आणून त्यांचे ठायीं नेट मारून करणें आणि शिपाईगिरीची व मनसुबेबाजपणाची शर्त करून यशास पात्र व्हावें तसेंच आहां. तदनुसार हें महत् यश घेऊन वजीरास पठाणांनीं व रोहिल्यानें फरारी करून तमाम दिल्ली-पर्यंत आक्रमशक्ति केली असतां त्यांची पुस्तपन्हा करून त्यांसी नतीजा देऊन नेस्तनाबूत केलें. वजीराचा बोलबाला करून, पादशाहास रोहिले पठाण घेऊं चहात होते ते पादशाहाच्या घरांत राखोन, त्यास संतोष व वचनास खरेपणा, महत् यशाची पराकाष्ठा होऊन, स्वामीसेवा, पैका व यश आजितागायत जहाली नाहीं तीं करून दाखविलींत. याजवरून फार संतोष झाला. तुम्हांस योग्य तेंच केलें व पुढेंही कराल हा निशाच आहे."* अशा प्रकारचे स्वामीगौरवाचे अमृततुल्य मनोरम उद्गार ऐकून कोणाचें हृदय हर्षभरित होणार नाहीं ?

वजीर सफदरजंग ह्यांच्या साहाय्यानें मराठ्यांस अर्थलाभ व कीर्तिलाभ चांगला झाला. तथापि त्यांचा, काशी व प्रयाग हीं हिंदूंचीं पुण्यस्थानें यवनाच्या ताब्यांत होतीं तीं हस्तगत करून तेथें आपला अंमल बसवावा व तेथील धर्मकृत्यें यथास्थित चालवून

* "पत्रें, यादी वगैरे" लेखांक ३६४.

हिंदुधर्माचें रक्षण करण्याचें आपलें ब्रीद उत्तम प्रकारें चालवावें असा फार हेतु होता. एवढ्याकरितां त्यांनीं सफदरजंगाकडून तीं मिळविण्याचा यत्न चालविला होता. हीं स्थानें मागें पुढें प्राप्त होतील असें समजून श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं शिंदे व होळकर ह्यांस सफदरजंगाशीं स्नेह संपादून व पुनः रोहिल्यास तो साहाय्य न करी असें करून दिल्लीहून देशीं येण्याविषयीं लिहिलें. त्यांचा मुख्य उद्देश दिल्लीदरबारांत सर्वांची मर्जी खुष ठेवून व प्राप्तलाभांत संतोष मानून तूर्त मराठे सरदारांनीं परत यावें असा होता. त्यांनी शिंदे होळकर यांस असें लिहिलें कीं :—

"सफदरजंग यास * निमरजावंद करून आपले लगामीं लावावयाचा विचार केला असे, म्हणून लिहिलें तें कळलें. ऐशियास हा विचार उत्तम केला. आम्हांस दिल्लीहून लिहिलें आलें होतें. आम्हींही त्यास येविशीं विचारानुरूप लिहिणें तें लिहून त्यास लगामी लावूं द्यावें, त्यांनीं † रकारपूर्वकाचें साह्य न करावें असें करावें, म्हणोन लिहिलें असे. तुम्हीही त्यास वरचेवर उचित जाणून लिहीतच असाल व लिहिणें. ज्यांत आपल्या मनसुबियास व कर्तव्यतेस उचित आणि उपयोगी, परिणाम उत्तम, लोकोत्तर, योग्यतर, लौकिक कीर्तिस्पद, तेंच करणें व कराल हा निशा आहे. सफदरजंग उमदा मनुष्य, त्याचा स्नेह हरप्रकारें करणें उचित. दुसरें, काशी त्याचे हातीं. ह्याशीं निखालसता असलिया कालगतीनें काशीचें स्पष्ट दर्शन होणार. तो महालाभ आहे. यासाठीं स्नेह रक्षावा. दुसरें अत्यंत अर्थाअर्थी संबंध नाहीं जाहला. अप्रिय भाषण करून विग्रह वाढविणें उचित

* निमरजावंद:-( निम=अर्धा. रंजावंद=खुषी ) कांहीं त्यासारखें करून, कांहीं त्याचें ऐकून.

† रकारपूर्वक:-रकार आहे ज्या शब्दाचे पूर्वी ते ह्मणजे रोहिले.

नव्हे. थोडासा तोटा जाहला तरी सोसून स्नेह रक्षणें उचित असे." ह्यावरून सफदरजंगासारखा उमदा वजीर राजी राखून, पुढील कार्यभाग साधण्याचा पेशव्यांचा हेतु किती मुत्सद्दीपणाचा होता हें चतुर वाचकांस सांगणें नकोच.

होळकर व शिंदे दिल्लीस असतांना तेथें त्यांचा व निजामउल्मुल्काचा मुलगा गाझीउद्दीन ह्याचा बराच स्नेह जडला. हा गाझीउद्दीन दिल्लीदरबारीं असल्यामुळें त्याचा धाकटा भाऊ नासिरजंग ह्यानें हैदराबादची सुभेदारी बळकाविली होती. तेव्हां गाझीउद्दीन ह्यानें ती परत मिळविण्याचे कामीं पेशव्यांचें साहाय्य मागितलें होतें. पेशव्यांनीं तें देण्याचें कबूल करून, दिल्लीच्या बादशहास, गाझीउद्दीन ह्यास दक्षिणेंत पाठविण्याबद्दल पत्रें लिहिलीं व होळकरास त्यास घेऊन येण्याबद्दल सांगितलें. त्याप्रमाणें होळकर व शिंदे दिल्लीचा कारभार आटोपून त्याच्यासह औरंगाबादेस आले. तों दिल्लीकडे पुनः गडबड उडाली. इ० स० १७५२ मध्यें अहमदशहा अबदाली पुनः पंजाबावर स्वारी करून आला. बादशहानें वजीर सफदरजंग ह्यास मदतीस बोलाविलें; परंतु तो तेथें येऊन पोहोंचण्यापूर्वींच अहमदशहानें मुलतान आणि लाहोर हे प्रांत हस्तगत केले व दिल्लीवर येण्याची भीति घातली. तेव्हां बादशहानें त्यास ते दोन्ही प्रांत देऊन पुढील अरिष्ट टाळलें.

इकडे गाझीउद्दीन औरंगाबादेस जाऊन दक्षिणची सुभेदारी मिळविण्याचा यत्न करीत होता. तो विषप्रयोगानें ता० १२ सप्तंबर इ० स० १७५२ रोजीं मारला गेला. ही बातमी दिल्लीस समजतांच त्याचा मुलगा मीर शहाबुद्दीन ह्यानें दुःखसागरांत बुडाल्याचें सोंग करून वजीर सफदरजंग ह्यास आपल्या मायावी भाषणानें मोहित केलें, आणि त्याजकडून 'गाझीउद्दीन' हा किताब व 'अमीर-उल्-उमरा'

हें पद प्राप्त करून घेतलें. नंतर त्यानें आपलें कपटजाल अधिक पसरून त्यांत बादशहासही गुंतविलें. बादशहा आपल्या पूर्ण ताब्यांत आला असें पाहून, त्यानें वजीर सफदरजंग ह्यास पदच्युत करण्याकरितां नानाप्रकारचे यत्न चालविले. ह्यांत त्यास बादशहाच्या मर्जीतला जावदखान नामक एक जनानखान्यांतील खोजा अनुकूल झाला होता. हें पाहून सफदरजंग ह्यानें त्या खोजाचा चांगला समाचार घेतला. त्यामुळें बादशहाची मर्जी सफदरजंगावर फार रुष्ट झाली. ती संधि साधून गाझीउद्दीन ह्यानें बादशहाकडून सफदरजंगाचें वजीर हें पद काढून घेवविलें. तेव्हां सफरदजंग उदास होऊन दिल्ली-दरबार सोडून लखनौस चालता झाला. तो पुनः दिल्लीस आला नाहीं. लखनौस गेल्यानंतर त्यानें तेथील राज्यकारभारांत आपलें मन घातलें, व प्रजेस सुख देण्याकरितां कित्येक सार्वजनिक कामें हातीं घेतलीं. लखनौ येथें गोमती नदीवर प्रचंड पूल बांधण्यास त्यानें सुरवात केली. परंतु तें काम सिद्धीस जाण्यापूर्वीच तो ता० १७ आक्टोबर इ० स० १७५४ रोजीं मृत्यु पावला. ह्याचें कबरस्थान दिल्ली येथें असून त्यावर सुजाउद्दौल्यानें फार प्रेक्षणीय इमारत बांधलेली आहे. ती 'सफदरजंग' ह्याच नांवानें अद्यापि प्रसिद्ध आहे.

सफदरजंग दिल्लीदरबारांतून निघून गेल्यानंतर मीर शहाबुद्दीन ऊर्फ गाझीउद्दीन ह्यानें शिंदे होळकरास पुनः आपल्या मदतीस बोलाविलें; आणि त्यांच्याकडून सफदरजंगाचा मित्र सुरजमल्ल जाट ह्यावर स्वारी करविली. जाट व मराठे ह्यांचा झालेला रणघोर संग्राम व कुंभेरीचा वेढा इतिहासप्रसिद्धच आहे. मराठ्यांचा जोर मिळतांच मीर शहाबुद्दीन ह्यानें बादशहा अहमदशहा ह्यास नेत्रहीन करून राज्यच्युत केलें; आणि सर्व सत्ता आपल्या हातीं बळकावून जहांदरशहाच्या नातवास, दुसरा अलमगीर हें नांव देऊन, दिल्लीच्या

सिंहासनावर बसविलें. अहमदशहा बादशहास गाझीउद्दीनाची ही कृतघ्नता पाहून परम दुःख झालें व त्यानें सफदरजंगास पुनः मदतीस बोलाविलें. परंतु त्यापूर्वींच तो हें नश्वर जग सोडून गेला होता, त्यामुळें बिचाऱ्या बादशहास कोणीच त्राता न सांपडून तो दुःखार्णवांत पडला. गाझीउद्दीनाची ही नीच व अधम कृति पाहून वाचकांस

उपकारोऽपि नीचानामपकारोऽपि जायते ।
पयःपानं भुजंगानां केवलं विषवर्धनम् ॥ १ ॥

ह्या सुभाषिताचें स्मरण झाल्यावांचून राहणार नाहीं.

# भाग ४ था.

## सुजाउद्दौला.

(इ० स० १७५४—इ० स० १७७५.)

सुजाउद्दौला ह्याचा जन्म इ० स० १७३१ मध्यें झाला. ह्याच्या जन्माची एक चमत्कारिक आख्यायिका प्रसिद्ध आहे. ती येणेंप्रमाणें:— "मनसूरअल्ली सफदरजंग ह्यास पुत्रसंतान नव्हतें. त्याच्या पदरीं अयोध्येसारखें मोठें राज्य, केवळ दुसरी पादशाहत, असें असून त्यास औरस संतति नाहीं; त्यामुळें तो नेहमीं उदासीन व चिंतातुर असे. केव्हां केव्हां त्यास पुत्रावांचून राज्यसुख घेण्यापेक्षां फकिरी बरी असें वाटत असे. म्हणून पुत्रप्राप्तीस्तव तो नेहमीं अतिथि-अभ्यागत, फकीरफुकरा वगैरे गरीब लोकांस द्रव्यदान, वस्त्रदान, व अन्नदान करीत असे. त्याचप्रमाणें अयोध्येंत ब्राह्मण व बैरागी यांचेकडून नेहमीं अनुष्ठानें करवीत असे. शेवटीं दैवयोगानें त्याच्या सत्कर्माचें सार्थक होऊन मुसलमानांची पवित्र भूमि जी मक्का तेथून एक अवलिया फकीर अयोध्येस आला. त्यानें मनसूरअल्लीच्या स्वप्नांत येऊन त्यास एक फळ दिलें आणि असा आशीर्वाद दिला कीं, "पुत्राकरितां तूं अत्यंत श्रमी आहेस; तरी हें फळ आपल्या स्त्रीस भक्षावयास दे म्हणजे तुला पुत्रप्राप्ति होईल." ह्याप्रमाणें सांगून तो सत्पुरुष अंतर्धान पावला. नंतर मनसूरअल्लीनें आपल्या पत्नीस तें प्रासादिक फळ भक्षावयास दिलें. पुढें कांहीं दिवसांनीं तिला पुत्ररत्न प्राप्त झालें. तोच सुप्रसिद्ध सुजाउद्दौला हा होय."*

---

* ही सुजाउद्दौल्याच्या जन्माची हकीकत "भाऊसाहेबांच्या बखरीमध्यें" प्रसिद्ध झाली असून ती नारो शंकर राजेबहादर ह्यांनीं जनकोजी शिंदे ह्यास



**SUJA UD-DAULA**

सुजाउद्दौला.

( इ० स० १७५४—इ० स० १७७५ )

सुजाउद्दौला ह्याचें मूळचें नांव जलालुद्दीन हैदर असें होतें. तो सफदरजंग मृत्यु पावल्यानंतर इ० स० १७५४ आक्टोबर महिन्यांत अयोध्येच्या गादीवर बसला; व त्यानें आपणास सुजाउद्दौला हें नांव धारण केलें. त्याजवर मनसूरअल्लीचें अत्यंत प्रेम असल्यामुळें तो सदैव त्याच्या स्वारीबरोबर असे. त्यामुळें त्यास बाळपणापासूनच अनेक राजकारस्थानांची ओळख होऊन राजकीय शिक्षण प्राप्त झालें होतें. त्याचप्रमाणें त्यास युद्धकलेचीही माहिती चांगली झाली होती. घोड्यावर उत्तम प्रकारें बसणें, तलवार, भाला वगैरेंचे हात टाकणें, बंदुकीचें निशाण मारणें वगैरे गोष्टी त्यास लहानपणापासूनच अवगत होत्या. त्याची अंगकांति अत्यंत तेजःपुंज असून त्याचें शरीरसामर्थ्य लोकोत्तर होतें. मुसलमानी इतिहासकार डो ह्यानें त्याचें असें वर्णन केलें आहे कीं, "तो अत्यंत सुस्वरूपवान असून फार भव्य व देखणा पुरुष होता. त्याची उंची पांच फूट अकरा इंच होती. त्याची शक्ति फार विलक्षण असे. तो तलवारीच्या एका वारासरशीं एका मोठ्या बलाढ्य रेड्याचें डोकें उड-

---

सुजाउद्दौल्याशीं राजकारण करण्याचे प्रसंगीं सांगितली म्हणून त्याच बखरींत लिहिलें आहे. ही हकीकत सांगितल्यानंतर नारो शंकरास कोणी असा प्रश्न विचारिला कीं, "मनसूरअल्ली ह्याचा म्लेंच्छयोनींत जन्म, अमंगल तप, तेव्हां त्याचें फळ त्यास चांगलें कसें प्राप्त झालें?" तेव्हां त्यानीं उत्तर दिलें कीं, "भक्तपणा कांहीं पहावयास लागत नाहीं. दैत्यकुळीं भक्त प्रल्हाद झाला कीं नाहीं? किंवा राक्षसकुळीं बिभीषण झाला कीं नाहीं? तसें, अविंधाशीं मतलब नाहीं. तो केवळ नेकजाद प्राप्तपुरुष होता. असें दुवाचें फळ या योगेंकरून बल उत्कर्ष प्राप्त जाहलें." ह्या आख्यायिकेवरून सुजाउद्दौला हा सत्पुरुषाच्या आशीर्वादाचा व ईश्वरीकृपेचा पुत्र होता असा मराठ्यांचा समज असावा असें दिसतें.—भाऊसाहेबांची बखर, पृष्ठ ५५.

वीत असे. तो अत्यंत चपल, विषयासक्त व महत्त्वाकांक्षी असे. त्याचे नेत्र विशेष पाणीदार होते. त्यावरून सकृद्दर्शनीं, त्याची बुद्धिमत्ता अलौकिक असावी असें वाटे, परंतु वस्तुतः तितकी ती कुशाग्र नसे. तो राजकारणापेक्षां स्वारीशिकारीच्या कामासच अधिक योग्य होता असें म्हटलें तरी चालेल. पुष्कळ दिवसपर्यंत त्याचें राज्यकारभाराकडे मुळींच लक्ष्य नव्हतें. तो सूर्योदयापूर्वी उठे, घोड्यावर स्वार होई, आणि एखाद्या अरण्यामध्यें जाऊन एखाद्या वाघाची अथवा काळविटाची शिकार करून दुपारीं घरीं येत असे. नंतर नदीप्रवाहामध्यें जाऊन यथेच्छ जलक्रीडा करीत असे, व सायंकाळीं रंगमहालांतील लावण्यवती अभिसारिकांबरोबर मन्मथलीला करीत असे."* बाळपणापासून त्याचे विशेष लाड झाल्यामुळें त्यास सुखो-

* सुजाउद्दौल्याच्या लोकोत्तर सामर्थ्याची कीर्ति मराठ्यांसही विश्रुत असावी असें दिसतें. "भाऊसाहेबांच्या बखरी" मध्यें नारो शंकरानीं सुजाउद्दौल्याच्या सामर्थ्याबद्दल जनकोजी शिंद्याजवळ पुढील उद्गार काढिल्याचा उल्लेख सांपडतो. "तो (सुजाउद्दौला) केवळ मनुष्य नव्हे. प्रत्यक्ष अंगींही दैत्य आणि कुळींही दैत्य. बळेंही भारी. हत्तीचे मागील पायावरी पाय देऊन शेंपूट ओढून धरिलें तरी हत्ती जाऊ न पावे. तसेंच भागीरथीसारखी नदी, मोठें विस्तीर्ण पात्र, तें सुजाउद्दवला यानें सहज आडसांगडीनें रिकामें यावें जावें. बुडी देऊन सुसर ओढून काढावी. उमर तो पहिली पंचविशी, परंतु शक्ति एवढी. (पृष्ठ० ५४)." सुजाउद्दौल्याच्या सामर्थ्याबद्दलची प्रसिद्धि बखर लिहिण्याच्या वेळींच होती असेंच नसून ती अलीकडेही आहे. श्रीमंत रघुनाथराव अण्णासाहेब विंचूरकर ह्यांच्या "तीर्थयात्राप्रबंध" नामक पुस्तकांत पुढील उल्लेख सांपडतो:- "लखनौ येथील नबाबाचे पूर्वज पूर्वी दिल्ली येथील बादशहाचे वजीर असतां त्याचे वंशांत सुजाउद्दौला म्हणून एक पुरुष जन्मला. त्याची शरीरशक्ति फारच विलक्षण होती. त्याविषयीं लोकांत अशी दंतकथा आहे कीं, तो शरयू नदींत कधीं कधीं पोहण्यास जात असे, आणि हरएक प्रसंगीं त्या नदींतून एक मगर धरून

पभोगांची व चैनीची संवय लागली असावी हें उघड आहे. अयोध्येचा राज्यकारभार त्याचे हातीं आल्यावर हळू हळू त्याचें मन राजकारणाकडे लागत चाललें.

सुजाउद्दौला अयोध्येचा सुभेदार झाला त्या वेळीं दिल्लीदरबारांत सर्व घोंटाळा झाला होता. मीर शहाबुद्दीन ऊर्फ गाझीउद्दीन हा सर्वसत्ताधिकारी होऊन त्यानें बादशहा दुसरा अलमगीर ह्यास आपल्या कैदेमध्यें ठेविलें होतें. बादशहाजादा अल्लीगोहर हा आपला पक्ष स्वतंत्र व्हावा एवढ्याकरितां चोहींकडे आश्रय शोधीत होता. रोहिल्यांचा पुढारी नजीबखान हा आपलें वर्चस्व दिल्लीदरबारीं स्थापन करून वजिरीची सूत्रें आपल्या हातीं यावींत व रोहिलखंडावर आपला अंमल अबाधित चालावा म्हणून यत्न करीत होता. उत्तरेकडे अहमदशहा अबदाल्ली हा दिल्ली पादाक्रांत करून हिंदुस्थानांतील अपार संपत्ति स्वदेशीं नेण्याकरितां एकसारखा झटत होता. दक्षिणेकडे मराठे सरदार शिंदे होळकर, आणि त्यांचे प्रमुख सेनापति पेशवे राघोबादादा हे रजपुतांशीं युद्धें करून व त्यांच्यावर खंडण्या लादून दिल्लीच्या दरवाज्यापर्यंत जाऊन पोहोंचले होते, आणि ज्याच्या मार्फत दिल्लीपदपादशाहीचीं सूत्रें आपल्या हातीं येतील व आपलें कोटकल्याण होईल त्यास हाताशीं घेऊन अंतःप्रवेश करण्याचा त्यांचा यत्न चालला होता. ह्या सर्वांप्रमाणें सुजाउद्दौला हाही आपलें पाऊल पुढें टाकून आपलें हित साधण्याची इच्छा करीत होता.

---

आणून त्याची नाभ तळून खात असे. हत्तीचें शेंपूट धरून त्याचें पुढें चालणें बंद करीत असे. तो मोठा विषयी होता. आणि आपली विषयसुख घेण्याची शक्ति वृद्धिंगत व्हावी म्हणून हमेषा वाजीकरणाचा उपयोग करीत असे. (पृष्ठ ८८)" ह्यावरून मुसल्मानी व मराठी ग्रंथांत सुजाउद्दौल्याच्या शरीरसामर्थ्याचे सारखेंच वर्णन आहे असें दिसून येते.

तात्पर्य, ज्याप्रमाणें वनामध्यें एखादें भक्ष्य सांपडलें म्हणजे त्यावर सर्व हिंस्त्र श्वापदांचीं एकदम उडी पडते व त्यांत जो अधिक बलवान् व अधिक धूर्त असतो त्यास यश मिळतें, त्याप्रमाणें सध्यांची स्थिति झाली होती. ह्या वेळीं मराठ्यांच्या सत्तेचा जोर सर्वांत अधिक वाढला होता. त्यांचीं ठाणीं राजपुताना, माळवा, अंतर्वेद, दिल्ली रोहिलखंड, बुंदेलखंड ह्या सर्व प्रांतांमध्यें अनेक जागीं बसलीं होतीं; आणि त्यांचें प्राबल्य इतकें वाढलें होतें कीं, दिल्लीची बादशाही समूळ लयास जाऊन लवकरच मराठ्यांचा भगवा झेंडा इंद्रप्रस्थावर मोठ्या डौलानें फडकत राहण्याची वेळ आली होती. दिल्लीचा वजीर गाझीउद्दीन, रोहिला सरदार नजीबखान, आणि अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला ह्या तिघांनीं मराठ्यांशीं विनम्र होऊन आपला भाग्योदय करून घेण्याकरितां आपसांत चढाओढ लाविली होती, असें म्हटलें असतां हरकत नाहीं. इ० स० १७५४ पासून इ० स० १७५८ पर्यंत ज्या घडामोडी झाल्या त्यांमध्यें ह्या तीन महत्त्वाकांक्षी पुरुषांच्या वादामुळें मराठ्यांचा फार फायदा झाला असेंच दिसून येईल.

इ०स० १७५४ मध्यें वजीर गाझीउद्दीन ह्यानें अहमदशहा बादशहास पदच्युत करून दिल्लीचीं सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं हें मागें सांगितलेंच आहे. तेव्हांपासून त्यानें सुजाउद्दौला व नजीबखान ह्यांच्या प्रांतांवर जास्त खंडणी बसवून ती जबरदस्तीनें वसूल करण्याचा यत्न चालविला होता. त्यानें मराठ्यांस वश करून व त्यांस कांहीं लाख रुपये कबूल करून दिल्लीची वजिरी आपले हातून न जावी अशी खटपट चालविली होती. इतक्यांत इ०स० १७५६ मध्यें अहमदशहा अबदाली ह्यानें हिंदुस्थानावर स्वारी केली. त्यानें दिल्ली, मथुरा वगैरे शहरें लुटलीं, आणि नजीबखान रोहिल्यास अलमगीर बादशहाचा मुख्य प्रधान व सेनापति नेमून तो निघून गेला.

इकडे गाझीउद्दीन ह्यानें मराठ्यांशीं सख्य करून त्यांच्या मदतीनें दिल्लीवर पुनः चाल केली व दिल्ली हस्तगत करून घेऊन नजीबखानास रोहिलखंडामध्यें पळवून लाविलें. नजीबखानाचा पुरा सूड मराठ्यांनीं उगविला असता, परंतु त्यानें मल्हारराव होळकरास शरण जाऊन त्यास "मी तुमचा धर्मपुत्र आहें, माझें रक्षण करावें" अशी प्रार्थना करून त्याजकडून अभय मिळविलें होतें, त्यामुळें तो बचावला गेला. नजीबखान मराठ्यांचा कट्टा शत्रु असून त्यानेंच अबदालीस हिंदुस्थानांत येण्याबद्दल पाचारण केलें होतें. त्यानें मराठ्यांचा वरपगडा पाहतांच त्यास ३० लक्ष रुपये कबूल करून बक्षीगिरी देण्याविषयीं बोलणें लाविलें होतें. परंतु तो "पुरा हरामखोर बाट (लुच्चा)" असून "तो दिल्लींत प्रविष्ट जाहलिया अबदालीचेंच दिल्लींत ठाणें बसलेंसें जाणावें. बेमान हरामखोर आहे. त्यास वाढविणें सर्पास दूध पाजण्यासारखें आहे. फावलेमानीं त्याचें पारिपत्य करावें*." असा श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनीं त्या वेळीं मराठ्यांचे सरदार दत्तोजी व जनकोजी शिंदे ह्यांस उपदेशही केला होता. असें असून मल्हारराव होळकरानें त्यास ह्या वेळीं पाठीशीं घेतलें ही मराठ्यांस फार हानिकारक गोष्ट झाली.

सुजाउद्दौल्याचा बाप मनसूरअल्ली सफदरजंग ह्याचे वेळेपासून काशी, प्रयाग व अयोध्या हीं हिंदूंचीं क्षेत्रें आपल्या ताब्यांत घ्यावींत असा पेशव्यांचा व मराठे सरदारांचा फार हेतु होता. एके वेळीं बाळाजी बाजीराव पेशव्यांनीं काशी हस्तगत करण्याकरितां काशीवर स्वारी करण्याचाही विचार केला होता, परंतु तेथील ब्राह्मणांस मुसलमान करण्याची कृति सुजाउद्दौल्यानें काढल्यामुळें त्यांचा विचार रहित

* "पत्रें, यादी वगैरे" लेखांक ३६१.

झाला, अशीही आख्यायिका प्रसिद्ध आहे.* अर्थात् मनगटाच्या

* ह्या संबंधानें पेशव्यांच्या बखरीमध्यें पुढील आख्यायिका प्रसिद्ध आहेः— "श्रीमंत नानासाहेब पेशवे हिंदुस्थानच्या स्वारीस गेले. तेथें जाऊन मुलखाच्या खंडण्या वगैरे घेऊन माघारे फिरले. त्या वेळेस श्रीमंताचे मनांत गोष्ट वागली कीं, काशीस जाऊन काशी घ्यावी. ह्या बेतानें स्वारीच्या ढाला पाठीमागें काशीकडे फिरविल्या. पुढें काशीच्या अलीकडे १५ । १६ कोशांवर मुक्काम झाला. त्या समयीं काशीस सुजाउद्दौला राज्य करीत होता. त्यास असा मजकूर समजला की, पेशवे काशी घ्यावयास येतात. हा मजकूर पक्का त्याजला समजतांच घाबरून सर्व क्षेत्रींचे ब्राह्मण जमा करून आणिले. त्या वेळेस नारायण दीक्षित पाटणकर हे काशीस होते. तेही त्यानें आणिले. तेव्हां सुजाउद्दौला याने सर्वांस सांगितलें कीं, "तुमचे ब्राह्मण राजे काशी घ्यावयास येतात. त्यांस माघारें फिरवावें, नाहींतर तुम्हा सर्वांस मुसलमान करीन." अशी जरब सुजाउद्दौला यानें देतांच सारे ब्राह्मण भिऊन सुजाउद्दौल्यास बोलले कीं, "आम्ही त्यास माघारें फिरवितो." असें बोलून तीन चारशें ब्राह्मण दीक्षितसुद्धां काशींतून उघडे बोडके निघाले, ते नीट श्रीमंताचे लष्करांत चार सहा घटका रात्रीस येऊन पोहोंचले. ते ब्राह्मण आले हें पाहून नानासाहेब डेऱ्याबाहेर येऊन उभे राहिले. दीक्षित पाटणकर यांस पाहून श्रीमत म्हणतात कीं, "असे उघडे बोडके कां आला?" त्या वेळेस नारायण दीक्षित ह्यांनीं श्रीमतांस सांगितलें कीं असा मजकूर झाला. तेव्हां आमचें ब्राह्मणपण राखावयाचें असल्यास आपण माघारें फिरावें, हें चांगलें." असा मजकूर ऐकून श्रीमंत दीक्षितांस म्हणतात; "इतक्या ब्राह्मणांस दुःख आम्हांसाठीं होतें, तेव्हां या गोष्टीची गरज आम्हांस नाहीं. आपण स्वस्थ असावें." × × × असें अभय देऊन श्रीमंतांनीं काशीच्या स्वारीचा बेत रहित केला व आपण गुप्तरूपानें ब्राह्मणमंडळीत शिरून गंगास्नान करून आले. ह्या हकीकतीमध्यें अकालवर्तित्वाची कांहीं चूक झाली असावी असें दिसतें. कारण, नानासाहेब उत्तर हिंदुस्थानांत जाऊन गंगास्नान करून इ० स० १७४३ ह्या वर्षी आले असा उल्लेख सांपडतो. ह्या वेळीं मनसूरअल्ली हा अयोध्येचा नबाब होता. तेव्हां ही गोष्ट सुजाउद्दौल्याचे कारकीर्दीत घडली असें म्हणणें विसंगत दिसतें.

जोरावर काशी, प्रयाग हीं पुण्यक्षेत्रें सर करणें शक्य नाहीं असें पाहून त्यांनीं सुजाउद्दौल्याची मनधरणी करून गोडीगुलाबीनेंच तीं मिळविण्याची खटपट चालविली होती. सुजाउद्दौला मराठ्यांशीं स्नेहभावानें अंतःकरणपूर्वक वागत नसून बाह्यात्कारें मात्र लोभ दाखवीत असे. मराठ्यांचें प्राबल्य त्यास सहन होत नसून तो आंतून नजीबखान रोहिल्याशीं मित्रत्वानें वागत असे. परंतु त्यास वेळोवेळीं मराठ्यांची मदत लागे, म्हणून त्याला मराठ्यांचा बाह्यतः स्नेह ठेवणें भाग पडत असे. अबदाल्ली दिल्लीहून इ० स० १७५७ मध्यें परत गेल्यानंतर मराठ्यांनीं गाझीउद्दीनाचा पक्ष घेतला व नजीबखानाचा पराभव करून त्यास रोहिलखंडांत पिटाळून लावलें. त्या समयीं त्यानें दिल्लीची वजिरी प्राप्त करून घेण्याकरितां मराठ्यांस ५० लक्ष रुपये व काशी, प्रयाग हीं महाक्षेत्रें देण्याचें बोलणें लाविलें होतें. सुजाउद्दौल्याच्या बोलण्यांत खरेपणा कमी आहे अशी मराठ्यांची खात्री होतीच; तथापि त्यांनीं जुळल्यास त्याचें म्हणणें कबूल करण्याचा विचार केला होता. ह्या संबंधानें बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं दत्ताजी व जनकोजी शिंदे व त्यांचे दिवाण रामाजी अनंत दाभोळकर ह्यांस असें लिहिलें होतें कीं, "गाझीउद्दीनखानास आपणच दिवाणगिरी दिली आहे. त्यानें करारांत अंतर पाडलें तर त्याची भीड कशास पाहिजे? मनसूरअल्लीचा मुलगा सुजाउद्दौला ह्यानें काशी, प्रयाग देण्याचें मागेंच ( इ० स० १७५५ सालीं ) दादासाहेबांजवळ कबूल केलें आहे. जर त्यास वजिरी देणें असेल तर काशी व प्रयाग हीं दोन तीन स्थळें व पन्नास लाख रुपये तावडतोब रोख घ्यावे व मग त्यास वजिरात द्यावी." दिल्लीच्या वजिरातीची योग्यता पूर्वी अधिक होती, त्यामुळें सुजाउद्दौल्याचा बाप वजिरीसाठीं काळ घोटीत होता. आतां पाद-

शाहींत जीव राहिला नाहीं. तेव्हां सुजाउद्दौल्याच्या ह्या वरकरणी थापा आहेत कीं काय, ह्याचाही सुरजमल्ल जाट व गोविंदपंत बुंदेले यांच्या मार्फतीनें शोध करून व एखादा इतबारी शहाणा माणूस तिकडे पाठवून, सर्व रागरंग पहावा; अशीही पेशव्यांनीं त्यांस सूचना केली होती. त्यांचा मुख्य मनसबा सुजाउद्दौल्यास अनुकूल करून घेऊन, काशी प्रयाग व पन्नास लाख रुपये रोख घेणें हा होताच, तथापि सुजाउद्दौल्यास सामील करून बंगाला सर करावा व मातबर पैसा मिळवावा, ह्या पुढील लाभावर त्यांची दृष्टि विशेष होती.* सुजाउद्दौल्यानें ही गोष्ट अमलांत न आणितां आपल्या गोड गोड थापांनीं मराठ्यांस कांहीं कालपर्यंत नादीं मात्र लाविलें होतें.

इ० स० १७५८ मध्यें राघोबादादांनीं लाहोरपर्यंत चाल करून तेथील बंदोबस्त केला. त्या गडबडींत सुजाउद्दौल्यावरील मोहीम सिद्धीस गेली नाहीं. तेव्हां त्यांनीं व विठ्ठल शिवदेव विंचूरकर ह्यांनीं त्याजपासून बारा लक्ष रुपये खंडणी घेऊन त्या वर्षापुरता निकाल केला. परंतु पुनः १७५९ मध्यें दत्ताजी शिंदे ह्यास नानासाहेबांनीं काशी प्रयाग हस्तगत करून बंगाल्यावर मोहीम करावी व तेथें मराठ्यांचा अंमल बसवावा म्हणून महत्त्वाची कामगिरी सांगितली. त्याप्रमाणें दत्ताजी शिंदे हा इ० स० १७५९ च्या मे महिन्यांत अंतर्वेदींत शिरून नजीबखान रोहिल्याचा पिच्छा पुरवूं लागला. रोहिलखंडामध्यें त्यानें इतकी धामधूम मांडली कीं, एका महिन्यामध्यें १३०० गांवें त्यानें लुटून फस्त केलीं. हें मराठ्यांचें अरिष्ट अयोध्येवर येणार असें पाहून सुजाउद्दौल्यानें नजीबखानाशीं गुप्त तह केला व त्याच्या मदतीस जाऊन त्यानें मराठ्यांवर चाल केली. इतक्यांत अबदालीचें संकट आल्यामुळें दत्ताजी शिंदे ह्यानें रोहि-

* "पत्रें यादी वगैरे" लेखांक ३८७—३८८.

त्याचा मुकद्दमा तसाच तहकूब ठेविला व रोहिल्याशीं न झुंजतां तो अबदालीकडे वळला. सुजाउद्दौल्यास आपल्यावरचें संकट टळलें असें वाटून तो अयोध्येस गेला व तेथें स्वस्थ राहिला.

सुजाउद्दौला हा मातबर मुसलमान सरदार असल्यामुळें त्याच्या मदतीची मराठे व गिलचे एकसारखीच अपेक्षा करीत होते. सुजाउद्दौला अनुकूळ झाला तर रोहिल्यांचें पारिपत्य करण्यास फार उत्कृष्ट साधन होईल व त्याच्या मदतीनें अबदालीस तेव्हांच जेर करितां येईल अशी मराठ्यांस उमेद होती. तिकडे अबदालीसही सुजाउद्दौल्यासारखा प्रबळ मुसलमान अनुकूल झाला म्हणजे सर्व मुसलमान संस्थानिक आपणास अनुकूळ होतील अशी खात्री होती. म्हणून मराठे व अबदाली ह्यांनीं सुजाउद्दौल्यास आपापल्या पक्षास ओढण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता. मराठ्यांनीं शामजी रंगनाथ नामक आपला वकील सुजाउद्दौल्यापाशीं ठेविला होता. तिकडे अबदालीनें नजीबखान व जहानखान ह्या दोन पठाण सरदारांस सुजाउद्दौल्याकडे पाठविलें होतें. त्यांनीं इटावा, सकुराबाद वगैरे मराठ्यांचीं ठाणीं घेऊन सुजाउद्दौल्यापर्यंत प्रवेश केला. त्यांची व सुजाउद्दौल्याची बिठूर येथें गांठ पडून त्यांनीं सुजाउद्दौल्यास कानमंत्र सांगितला व त्याला आपल्याकडे पूर्णपणें वळाविलें. सुजाउद्दौला प्रतिपक्षास मिळाला ही मराठ्यांच्या राजकारणास फारच विघातक गोष्ट झाली, व त्यामुळें त्यांचें सर्वस्वीं नुकसान झालें. सुजाउद्दौल्याची व नजीबखानाची भेट होऊं न देतां त्यास अलिप्त राखणें फार जरूर होतें, परंतु कांहीं मराठे सरदारांच्या कुचराईमुळें ती गोष्ट घडली नाहीं असें कित्येकांचें मत आहे.* सुजाउद्दौल्याची व नजीबखानाची भेट झाली तेव्हां अबदाली अनुपशहरीं होता. ह्याकरितां एकदोन मराठे सरदारांनीं निवडक सैन्या-

* रा॰ राजवाडेकृत "मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें."

निशीं अंतर्वेदींत सुजाउद्दौला व नजीबखान ह्यांवर चाल करून त्यांस पेंचांत आणावें व आकस्मिक अबदालीवर तुटून पडून त्यास बुडवावें असाही सदाशिवरावभाऊ ह्यांनीं बूट काढिला होता, परंतु तोही दुर्दैवानें सिद्धीस गेला नाहीं. शेवटीं सुजाउद्दौला व नजीबखान हे मराठ्यांच्या तावडींतून निसटून, शिकंदरा येथें अबदालीस जाऊन मिळाले, व सर्वांनीं मिळून मराठ्यांच्या नाशाचा उद्योग आरंभिला.

सुजाउद्दौला अबदालीस मिळाल्यानंतर त्यानें त्याजपाशीं खूप पैसा मागितला व मारेकरी घातले म्हणून त्याला अबदालीचा पक्ष सोडण्याचीही इच्छा झाली. त्यानें कांहीं दिवस पुनः मराठ्यांशीं सलोख्याचा पत्रव्यवहार चालू केला. सुजाउद्दौल्यास नादीं लावण्यास नजीबखान रोहिला मूळ कारण होता. त्याच्या मनांत अबदालीस पादशाहत देऊन सुजाउद्दौल्यास वजिरी द्यावी व आपण बक्षीगिरी मिळवावी; आणि मराठ्यांचा समूळ विध्वंस करून रोहिलखंडावर निर्भ्रांत राज्य करावें हा आपमतलबी हेतु घोळत होता. त्यामुळें त्यानें युक्तिप्रयुक्ति करून व सुजाउद्दौल्यास आपल्या पक्षांत बळकट धरून मराठ्यांचा उच्छेद केला. सुजाउद्दौल्याच्या साहाय्यामुळें अबदालीस जोर चढून इ० स० १७६१ च्या जानेवारी महिन्यांत त्याचें व मराठ्यांचें झालेलें पानिपत येथील घनघोर रणकंदन इतिहासप्रसिद्धच आहे.

पानिपतच्या युद्धाचें साद्यंत वर्णन मराठी बखरीमध्यें उपलब्ध आहे. तेव्हां त्या संबंधानें चर्वितचर्वण करण्याची आवश्यकता नाहीं. तथापि ह्याच युद्धासंबंधानें खुद्द सुजाउद्दौल्याच्या पदरच्या एका गृहस्थानें समक्ष पाहिलेली हकीकत फारशी भाषेंत लिहिली आहे. त्याची माहिती येथें सादर करणें अत्यंत जरूर आहे. सुजाउद्दौल्याचा बाप वजीर सफदरजंग ह्यास मराठ्यांनीं इ० स० १७५० मध्यें उत्तम

साहाय्य केलें होतें, त्या वेळेपासून त्याचें व मराठ्यांचें बहुतेक सख्य होतें. त्यामुळें त्याच्या पदरीं दक्षिणेंतील कित्येक ब्राह्मण जाऊन राहिले होते. त्यांत पंडित काशीराज नामक एक गृहस्थ होता. ह्यावर सुजाउद्दौल्याची फार मर्जी जडल्यामुळें त्याचा सुजाउद्दौल्याच्या राजकारस्थानांत चांगला प्रवेश झाला होता. हा गृहस्थ पानिपतच्या युद्धामध्यें समक्ष हजर असून मराठ्यांचा पूर्ण हितचिंतक होता. ह्याचा व भाऊसाहेबांचा अंतस्थ पत्रव्यवहार असून त्यानें सुजाउद्दौल्यास मराठ्यांच्या बाजूस वळविण्याकरितां अश्रांत परिश्रम केले, असेंही दिसून येतें. पेशव्यांचा गणेश पंडित म्हणून एक बातमीदार सुजाउद्दौल्याच्या स्वारीमध्यें होता. त्याचा प्रवेश खुद्द नबाबापर्यंत होत नसल्यामुळें त्यास कच्ची बातमी कळत नसे, तेव्हां त्यास सर्व बातमी गुप्त रीतीनें काशीराजाकडून मिळत असे. काशीराज ह्यानें सुजाउद्दौल्याचें मन वळवून त्याजकडून मराठ्यांस मदत करविण्याचा फार यत्न केला, परंतु नजीबखान रोहिला मराठ्यांचा कट्टा शत्रु असल्यामुळें त्यानें त्याचें कांहीं चालूं दिलें नाहीं. अखेर निकरावर गोष्ट येऊन उभय पक्षांची लढाई झाली व तींत मराठ्यांचा पराभव झाला. ह्यानंतर गिलच्यांनीं विजयानंदाच्या भरांत शत्रूंची जी कत्तल केली व त्यांच्या जखमी व जीवंत धरलेल्या लोकांची जी विटंबना केली ती सर्वश्रुतच आहे. ह्या वेळीं मनुष्यस्वभावास अत्यंत शोभविणारी जी भूतदया व परोपकारबुद्धि ती फक्त ह्या काशीराजाच्या हृदयांत प्रज्वलित होऊन तिनें मराठ्यांकडील जखमी झालेल्या वीरवरांचा व धारातीर्थीं पतन पावून स्वर्गद्वार जिंकलेल्या नरश्रेष्ठांच्या पुण्यदेहांचा जो परामर्ष घेतला, तो त्या गिलच्यांच्या यशोवैभवापेक्षां शतपटीनें कौतुकास्पद आहे ह्यांत शंका नाहीं. ह्या हिंदुधर्माभिमानी जातिवंत मराठ्यानें सुजाउद्दौल्याच्या

हृदयांत दयेचे पाझर फोडून त्याच्याकडून मराठ्यांच्या प्रेतांची यथाविधि उत्तरक्रिया करण्याची परवानगी मिळविली. ह्या प्रसंगाची पंडित काशीराज ह्यानें जी हकीकत लिहिली आहे ती फारच हृदयद्रावक आहे. भारती युद्धांतील धृष्टद्युम्नतुल्य रणपटु योद्धा जनकोजी शिंदा हा तोफेचा गोळा लागून व हातामध्यें भाल्याची जखम लागून रणांगणीं पडला, त्या वेळीं त्यास गिलच्यांनीं पकडून आपल्या तंबूमध्यें नेऊन ठेविलें. तेथें काशीराजानें आपला प्रवेश करून त्याची भेट घेतली. त्या वेळीं पंडित काशीराजास पाहून जनकोजीनें खालीं मान घातली. तेव्हां काशीराजानें आपल्या धैर्य देणाऱ्या, उदार, दयापूर्ण व प्रेमळ वाणीनें त्यास असें सांगितलें कीं, "तुह्मांस असें खालीं मान घालण्याचें प्रयोजन नाहीं. वीराचा पुरुषार्थ म्हणून जो आहे तो तुह्मीं पूर्ण रीतीनें गाजविला आहे, आणि तुमची शौर्यकीर्ति यावच्चंद्रदिवाकरौ कायम राहील इतकी विमल आहे; मग तुम्हांस खिन्न होण्याचें कारण काय?" तेव्हां जनकोजीनें आशायुक्त मुद्रेनें इतकेंच सांगितलें कीं, "तें खरें आहे. परंतु मी रणांत मेलों असतों तर फार बरें झालें असतें. परंतु माझ्या दुर्दैवानें मला येथें आणिलें आहे! हे लोक आतां मजजवळ ७ लक्ष रुपये खंडणी मागत आहेत. मी ही खंडणी देखील दिली असती, परंतु अशा प्रसंगीं ती मला कोठून मिळणार? ह्याकरितां तुम्हीं माझ्या वडिलांचा व आपला पूर्वीचा ऋणानुबंध स्मरून व तुमच्या नबाबास आमच्या घराण्याचा पूर्वस्नेह व उपकार ह्यांची ओळख देऊन, त्याजकडून जर ही खंडणी देववाल व शत्रूंच्या हातांतून मला मुक्त कराल, तर मजवर आपले महत् उपकार होतील." काशीराजास हें भाषण ऐकून अत्यंत गहिंवर आला व त्यानें त्यास ही खंडणी मिळवून देण्याचा यत्न करितों असें आश्वासन दिलें. त्याप्रमाणें काशीराज ह्यानें जनकोजी शिंदे ह्याच्या मुक्ततेकरितां सुजा-

उद्दौल्याजवळ फार खटपट केली. परंतु ही बातमी दुर्दैवानें पाषाणहृदयी व कृतघ्न नजीबखानास कळली, व त्यानें त्यापूर्वीच जनकोजीचा वध करून आपली नीच तृष्णा तृप्त केली! तथापि काशीराजानें अनुपगीर गोसाव्यास आपल्या मदतीस घेऊन जनकोजी शिंद्याच्या प्रेताचें हिंदुधर्माप्रमाणें दहन केलें. त्याचप्रमाणें विश्वासरावप्रभृति मराठे वीरांचीं प्रेतें त्यानें मोठ्या मिनतवारीनें व सुजाउद्दौल्याच्या मध्यस्तीनें हस्तगत करून घेऊन त्यांचीही उत्तम प्रकारें व्यवस्था केली. ह्याच गृहस्थानें जीवंत सांपडलेल्या मराठ्यांस गुप्त रीतीनें दीगपर्यंत पोहोंचविण्याची खटपट करून सुरजमल जाटाकडून त्यांचें रक्षण करविलें व त्यांना सुरक्षित रीतीनें महाराष्ट्रदेशीं पाठविण्याचीही तजवीज केली. ह्या प्रसंगाचे काशीराजाचे उपकार मराठ्यांवर इतके अगणित आहेत कीं ते वर्णन करणें शक्य नाहीं. परंतु इतिहासाच्या अभावामुळें ते विस्मृतीच्या अंधःकारमय मंदिरांत लपून गेले आहेत व ते करणारा महाथोर पुरुष काशीराज हाही त्यांच्या बरोबर त्या मंदिरांत वास करीत आहे!!

पंडित काशीराज ह्याच्या माहितीप्रमाणें पाहिलें तर सुजाउद्दौला तटस्थ राहून त्यानें ह्या युद्धामध्यें विशेष पुढाकार घेतला नाहीं असें दिसतें. परंतु डो व फ्रांक्लिन ह्यांच्या माहितीप्रमाणें पाहिलें, तर त्याचेंच पराक्रम अबदालीस विजयश्री आळविण्यास कारणीभूत झाले असें दिसतें. फ्रांक्लिन ह्यानें शहाअलम बादशहाच्या चरित्रामध्यें असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, "नबाब सुजाउद्दौला ह्याच्याच पराक्रमामुळें व चातुर्यामुळें अबदालीस यश प्राप्त झालें; म्हणून त्यानें त्यास अभिनंदनपूर्वक मोठमोठ्या देणग्या देऊन त्याचा फार गौरव केला. त्यानें त्यास प्रेमभरानें आलिंगन देऊन व पुत्रवत् मानून त्याचें कौतुक केलें, आणि त्याच्याच नांवानें विजयाचीं रणशिंगें वाज-

विलीं व द्वाही फिरविली." असो. सुजाउद्दौला ह्यानें प्रत्यक्ष पुढाकार घेतला असो किंवा नसो, परंतु तो नजीबखान रोहिल्याच्या गोड भुलथापीस भुलून अबदालीस साहाय्य झाला, व त्यामुळें अबदालीचा पक्ष प्रबल होऊन त्यास मराठ्यांचा पराभव करितां आला ही गोष्ट निर्विवाद आहे.

पानिपतच्या लढाईत मराठ्यांचा पराभव झाल्यामुळें सुजाउद्दौला व रोहिले ह्यांस, मराठ्यांच्या ताब्यांतील सर्व ठाणीं परत घेऊन, रोहिलखंड व दुआब ह्यांमधील प्रांतावर आपला अंमल बसविण्यास मुळींच प्रयास पडले नाहींत. सुजाउद्दौल्यानें झांशीपर्यंत ठाणीं घेतलीं व मराठ्यांच्या हल्ल्यामुळें नाहींसा झालेला आपला सर्व प्रांत पुनः काबीज केला. तात्पर्य, मराठ्यांच्या अपजयामुळें त्यास आपला फायदा करून घेण्याची उत्तम संधि मिळाली, व त्याप्रमाणें त्यानें अयोध्येची विशेष भरभराट केली. तथापि, कालाच्या चक्रनेमिक्रमणाप्रमाणें त्यावरही लवकरच परराष्ट्रीयांचा पगडा बसून त्यास दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्याचा प्रसंग आला. तो निवेदन करण्यापूर्वी दिल्लीच्या राजकारस्थानांचें सिंहावलोकन करणें जरूर आहे.

वजीर गाझीउद्दीन हा दिल्लीदरबारीं अत्यंत प्रबल होऊन, त्यानें स्वसंस्थापित बादशहा अलमगीर ह्यास सक्त नजरकैदेमध्यें ठेविलें व त्याच्या बायकामुलांचे हाल मांडिले. तेव्हां बादशहाचा मुलगा अलीगोहर हा दिल्लीहून पळून गेला, व तो कोणाचा तरी आश्रय मिळावा म्हणून यत्न करूं लागला. शेवटीं इ० स० १७५८ मध्यें तो सुजाउद्दौल्याच्या राजधानींत आला. सुजाउद्दौल्यानें दिल्लीच्या सार्वभौम राजसत्तेचीं सूत्रें आपल्या हातीं अनायासें येतात असें पाहून त्याचा आदरसत्कार केला; व त्यास मदत करण्याचें कबूल केलें. अलीगोहर हा बादशहाचा औरस पुत्र असल्यामुळें त्यास बंगालची

सुभेदारी मिळवून द्यावी, व तेथील प्लासीच्या लढाईपासून सत्ताधारी बनलेल्या इंग्रज लोकांस घालवून द्यावें, असा सुजाउद्दौल्याचा विचार होता. अलीगोहर हा कांहीं सैन्य जमवून बंगाल प्रांतावर चाल करून गेला, परंतु लॉर्ड क्लाइव्ह ह्यानीं कांहीं पैसे देऊं करून त्यास कर्मनाशा नदीपासून परत फिरविलें. तेव्हां तो पुनः सुजाउद्दौला ह्याच्या ताब्यांत येऊन राहिला. तों इकडे गाझीउद्दीन ह्यानें, इ० स० १७५९ मध्यें, त्याच्या दुर्दैवी बापास—अलमगीर ह्यास—ठार मारिलें, व कांहीं दिवस दिल्ली येथें झोटिंगपादशाही चालविली. अलीगोहर ह्यानें आपणास-शहाअलम हें नांव धारण करून सुजाउद्दौल्यास वजिरी दिली व हरतऱ्हेनें दिल्लीचें सिंहासन प्राप्त करून घेण्याचा यत्न चालविला. ह्या समयीं, त्यास जो बादशाही देईल तो आपला मित्र, अशी त्याची स्थिति झाल्यामुळें, सुजाउद्दौला, फिरंगी व मराठे ह्या तिघांकडेही त्यानें राजकारण लाविलें. मराठ्यांना अबदालीचा व रोहिल्यांचा नाश करावयाचा असल्यामुळें, त्यांनीं पूर्वींच अलीगोहर ह्यास, दिल्लीचा बादशहा असें प्रसिद्ध करून, आपल्याकडे वळविण्याचा प्रयत्न केला होता, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. कारण, अलीगोहर हा पानिपतच्या युद्धामध्यें तटस्थ राहिला होता. तदनंतर त्यानें सुजाउद्दौल्याचेंच विशेष प्राबल्य आहे असें पाहून त्याचाच आश्रय केला. सुजाउद्दौला ह्यास मदतीस घेऊन बंगालप्रांत सर करण्याची मराठ्यांची पूर्वीं इच्छा होती, परंतु पानिपताच्या अपजयामुळें ती सिद्धीस गेली नाहीं. तेव्हां सुजाउद्दौल्यानें बादशहा आपल्या हातीं आला आहे असें पाहून बंगालप्रांतावर स्वारी करावी व इंग्रजांस घालवून द्यावें असा संकेत केला.

ह्या समयास इंग्रजांनीं पदच्युत केलेला बंगालचा नबाब कासीम अली हा पाटणा येथें इंग्रजांचीं कत्तल करून सुजाउद्दौल्याच्या

आश्रयार्थ अयोध्येस आला. त्या वेळीं त्याजबरोबर ८५ हत्ती नुसतें द्रव्य भरलेले होते. त्यानें सुजाउद्दौल्यास बंगालप्रांत सर करून दिल्यास दररोज एक लक्ष स्वारीखर्च व ३० लक्ष रुपये आणि पाटणाप्रांत बक्षीस देण्याचें कबूल केलें. तेव्हां अर्थातूच सुजाउद्दौल्यास मोह उत्पन्न होऊन तो बंगालप्रांतावर स्वारी करण्यास उद्युक्त झाला. नंतर शहाअलम, कासीमअल्ली व सुजाउद्दौला ह्या त्रिवर्गांनीं बक्सार येथें ता० १६ आक्टोबर इ० स० १७६४ रोजीं इंग्रजांशीं युद्ध केलें. त्यामध्यें त्यांचा पराभव झाला. तदनंतर शहाअलम इंग्रजांस जाऊन मिळाला. शहाअलम आपल्या ताब्यांत आला असें पाहून इंग्रजांनीं त्याजकडून, "दिल्लीचा सार्वभौम बादशहा" ह्या नात्यानें, दिवाणी नामक एक सनद, ता० २९ डिसेंबर १७६४ रोजीं लिहून घेतली; व तींत बंगाल, बहार व ओरिसा ह्या प्रांतांचें स्वामित्व आपल्याकडे घेऊन सुजाउद्दौल्याची सर्व जहागिरही त्यांत गोंवून घेतली. त्यापैकीं कोरा व अलहाबाद हे दोन प्रांत शहाअलम बादशहाकडे ठेविले; आणि आपणाकडे काशी, गाझीपूर हे दोन सुपीक परगणे लावून घेतले. बादशहाची राजरोस फर्मान मिळतांच इंग्रजांनीं सुजाउद्दौल्याचें पारिपत्य करून त्यास जेरीस आणण्याचा विचार केला. त्यांच्या व त्याच्या लहान लहान चकमकी सुरू झाल्या. शेवटीं कोरा येथें ता० ३ मे इ० स० १७६५ रोजीं त्याचा चांगला पराभव होऊन, त्यास इंग्रजांशीं तह करणें भाग पडलें. ह्याच समयास इंग्लंडांतील कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांजकडून कलकत्त्यास असें लिहून आलें कीं, "अयोध्या हा सुजाउद्दौल्याचा प्रांत असून तो बादशहाचे मार्फत आपल्या ताब्यांत घेणें ईस्ट इंडिया कंपनीस अहितकारक आहे. ह्याकरितां मराठ्यांच्या स्वाऱ्यांपासून कंपनीच्या मुलखाचें संरक्षण करण्याकरितां

तो प्रांत सुजाउद्दौल्याच्याच ताब्यामध्यें ठेवावा." त्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीचे त्या वेळचे हिंदुस्थानांतील अधिपति लॉर्ड क्लाइव्ह ह्यांनीं सुजाउद्दौल्याशीं ता० १६ आगस्ट इ० स० १७६५ रोजीं अलहाबाद येथें दोस्तीचा तह केला. ह्या तहामध्यें मुख्यत्वेंकरून, शहाअलम बादशहाच्या तैनातीकरितां कोरा व अलहाबाद हे प्रांत इंग्रजांस द्यावेत; कासीम अल्ली व इतर युरोपियन लोक ह्यांस आपल्या राज्यांतून घालवून द्यावें; काशीचा राजा बळवंतसिंग याजकडे काशी व गाझीपूर वगैरे परगण्यांची जहागीर सुरळीत चालवावी; आणि लढाईच्या खर्चाकरितां इंग्रजांस ५० लक्ष रुपये द्यावेत इत्यादि कलमें होतीं. ह्याप्रमाणें तह ठरून अयोध्येचा प्रबळ नबाब सुजाउद्दौला इंग्रजांचा दोस्त बनला.

वरील तहाप्रमाणें शहाअलम बादशहा अलहाबादेस राहिला व त्याचा निकट संबंध पुनः सुजाउद्दौल्याशीं जडला, ही गोष्ट इंग्रजांस लवकरच संशयास्पद वाटूं लागली. त्यांनीं, सुजाउद्दौला हा सैन्य जमवून अलहाबाद व कोरा हे प्रांत घेण्याकरितां पुनः यत्न करील व त्याचें वर्चस्व कंपनीच्या उत्कर्षास अपायकारक होईल ह्या भीतीनें, त्याच्या सैन्याची संख्या मर्यादित करण्याचा विचार केला. कलकत्त्याहून इंग्रजाचे तीन वकील जॉन कार्टियर, रिचर्ड स्मिथ व क्लॉड रसेल हे त्याची भेट घेण्याकरितां मुद्दाम काशीस गेले. तेथें त्यांनीं सुजाउद्दौल्याशीं गोड भाषण करून त्याजकडून अयोध्येच्या सैन्याची संख्या ३५ हजारपर्यंत नियमित केली. ही गोष्ट ता० २९ नोव्हेंबर इ० स० १७६८ रोजीं झाली. ह्यानंतर सुजाउद्दौल्यानें दोन तीन वर्षेंपर्यंत कोणत्याही लढाईमध्यें फारसें लक्ष्य घातलें नाहीं. परंतु पुनः त्यास राजकारणामध्यें पडण्याचा प्रसंग आला.

पानिपतच्या अपयशामुळें अगदीं खचून गेलेला मराठ्यांचा उत्साह

पुनः थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दींत उदीत झाला ; व मराठ्यांचे सरदार विसाजी कृष्ण बिनिवाले, रामचंद्र गणेश कानडे, तुकोजी होळकर, आणि महादजी शिंदे हे रोहिल्यांचा सूड उगविण्याकरितां, हळूहळू आपल्या हातांतून गेलेला प्रांत काबीज करीत करीत, दिल्ली व रोहिलखंड येथपर्यंत जाऊन पोहोंचले. इंग्रज व सुजाउद्दौला ह्यांच्या अनुसंधानानें प्रयागक्षेत्रीं आयुष्य क्रमीत बसलेला बादशहा शहाअलम ह्यास दिल्लीपदावर आरूढ करून, दिल्लीच्या पादशाहीचीं सर्व सूत्रें आपण चालवावींत, अशी महत्वाकांक्षा त्यांस वाटूं लागली. त्यांनीं शुक्रताल येथें नजीबखान रोहिल्याचा पुत्र जाबताखान ह्याशीं लढाई केली व त्यास कुमाऊनच्या पहाडामध्यें रेटिलें. नंतर ते मोठ्या विजयानंदानें बादशहास बरोबर घेऊन दिल्ली येथें ता० २५ दिसेंबर इ० स० १७७१ रोजीं दाखल झाले. तेथें त्यांनीं सर्व वजिरांस अंकित करून बादशहास तक्तावर बसविलें, आणि त्यांजकडून अलाहाबाद, कोरा, इटावा वगैरे प्रांतांच्या सनदा मराठ्यांस बक्षीस करून घेतल्या.

रोहिले व मराठे ह्यांचें युद्ध चाललें असतांना सुजाउद्दौला ह्यानें रोहिल्यांस साहाय्य करून त्यांजकडून ४० लक्ष रुपये घेण्याचा ठराव केला. इंग्रजांस मराठ्यांशीं टक्कर देण्यास कोणी तरी बलिष्ठ दोस्त पाहिजे होताच; तेव्हां त्यांनीं सुजाउद्दौल्याशीं दोस्ती राखून त्यास आपल्या तंत्रांत ठेविलें. सुजाउद्दौल्यानें रोहिल्यांशीं धरसोडीचें वर्तन ठेवून शेवटीं इंग्रजांच्या साहाय्यानें त्यांशीं युद्ध मांडिलें. मराठे डोईजड होऊन अयोध्या पादाक्रांत करणार, अशी भीति उत्पन्न झाल्यामुळें सुजाउद्दौल्यानें इंग्रज सैन्य मदतीस घेऊन जय्यत तयारी चालविली. त्यानें चुनार व अलहाबाद हे दोन बळकट किल्ले इंग्रज सैन्यास राहण्याकरितां दिले. ह्या वेळीं वॉरन हेस्टिंग्ज हे

हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल होते. त्यांनीं सुजाउद्दौल्याकडून फायदा करून घेण्याची ही चांगली संधि आहे असें पाहून, त्याची काशी येथें भेट घेतली व त्याजबरोबर नवीन तह केला. त्यांत अलहाबाद व कोरा हे प्रांत शहाअलम बादशहाकडे होते, ते त्यानें मराठ्यांस दिले होते, परंतु तसें करण्यास त्यास अधिकार नाहीं, सबब ते प्रांत सुजाउद्दौल्यास विकत देऊन त्याजकडून ५० लाख रुपये घेण्याचा ठराव केला. त्याचप्रमाणें सुजाउद्दौल्याकडे जें इंग्रज सैन्य होतें, त्याजबद्दल खर्चाची भानगड पडूं नये म्हणून त्यानें दरमहा २,१०,००० रुपये रोख द्यावेत असें ठरविलें. ह्या सर्व गोष्टी सुरळीत चालण्याकरितां सुजाउद्दौला ह्याच्या दरबारीं इंग्रजांचा एक वकील असावा अशीही वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं इच्छा दर्शविली. ती सुजाउद्दौल्यानें मान्य केली. त्यामुळें मि० मिडल्टन नामक एक रेसिडेंट लखनौ येथें इ० स० १७७३ सालीं दाखल झाला. सुजाउद्दौला व रोहिले ह्यांची चुरस लागून सुजाउद्दौल्यानें त्यांचा नाश करण्याकरितां इंग्रज सैन्याचें साहाय्य घेतलें. रोहिल्यांच्या विरुद्ध इंग्रज सैन्य पाठवावें न पाठवावें ह्याबद्दल कलकत्ता कौन्सिलमध्यें दुफळी झाली. शेवटीं वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं, केवळ द्रव्यलोभानें, सुजाउद्दौल्यास मदत करून रोहिल्यांविरुद्ध लढण्याकरितां इंग्रज सैन्य त्याजकडे पाठविलें. सुजाउद्दौला व रोहिला सरदार हाफिज रहिमतखान ह्यांची बाबुलनाला येथें ता० २३ एप्रिल इ० स० १७७४ रोजीं लढाई झाली. तींत रोहिल्यांचा पराभव होऊन त्यांच्या सैन्याची सुजाउद्दौला व इंग्रज ह्यांनीं भयंकर कत्तल केली व अतिशय लूट मिळविली. सुजाउद्दौल्यास ह्या कामीं वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं केवळ द्रव्यलोभास्तव साहाय्य करून ब्रिटिश कीर्तीस अक्षय्य कलंक लाविला. म्हणून ह्या रोहिल्यांच्या युद्धाचें एक प्रकरण माजलें; व त्याब-

द्दल वॉरन हेस्टिंग्ज ह्यांजवर भयंकर आरोप येऊन इंग्लंडमध्यें त्यांची चौकशी झाली. त्याचा संबंध प्रस्तुत विषयाशीं नसल्यामुळें त्याबद्दल अधिक चर्चा करण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

रोहिल्यांचें युद्ध समाप्त झाल्यानंतर कलकत्ता कौन्सिलमध्यें वॉरन हेस्टिंग्ज ह्यांच्या विरुद्धपक्षाचें प्राबल्य झालें; आणि त्यांनीं वॉरन हेस्टिंग्ज ह्याची प्रत्येक कृति चुकीची ठरवून त्यांनीं केलेली सर्व व्यवस्था रद्द केली. ह्या गडबडीमध्यें त्यांनीं लखनौचा पूर्वीचा रेसिडेंट मिडल्टन ह्यास काढून टाकून त्याच्या जागीं ब्रिस्टो ह्या नांवाचा आपल्या वतीचा माणूस ठेविला. ह्या रेसिडेंटाबद्दल मोठ्या कडाक्याचा वाद माजून शेवटीं वॉरन हेस्टिंग्जच्या पक्षाची सरशी होईपर्यंत तो लखनौ येथें कायम राहिला. हा वाद चालला असतांनाच सुजाउद्दौला फैजाबाद येथें ता० २६ जानेवारी इ० स० १७७५ रोजीं मृत्यु पावला.* ह्याची कबर फैजाबाद येथें "गुलाबारी" ह्या नांवानें प्रसिद्ध आहे.

सुजाउद्दौला ह्याची कारकीर्द अतिशय महत्त्वाची आहे. मरा-

---

* सुजाउद्दौला ह्याच्या मृत्युबद्दल दोन निरनिराळ्या दंतकथा प्रचलित आहेत. "सियारुलमुताखरीन" ग्रंथामध्यें असें लिहिलें आहे कीं, हाफिज रहिमतखान ह्याचा वध करून रोहिलखंड काबीज केल्यानंतर सुजाउद्दौल्यानें, हाफिज रहिमत ह्याच्या लावण्यवती कन्येवर वाईट दृष्टि ठेविली आणि तिच्या पातिव्रत्याचा भंग करण्याचा प्रयत्न केला; म्हणून तिनें गुप्त रीतीनें आपल्याजवळ विषदिग्ध कट्यार घेऊन ती सुजाउद्दौल्यावर चालविली. तिचे सविष टोंक त्याच्या शरीरांत जाऊन त्यास जखम झाली व त्यामुळें तो बरेच दिवस आजारी पडून मृत्यु पावला. मि० कार्नेगी ह्यांनीं सुजाउद्दौल्याच्या मृत्यूचें कारण त्याच्या विरुद्ध पक्षाची कलकत्ता कौन्सिलमधील सरशी हेंही दिलें आहे. पण तें संभवनीय दिसत नाहीं.

त्यांच्या पानिपत येथील अपयशास सुजाउद्दौला पुष्कळ अंशीं कारणीभूत झाला. त्याचप्रमाणें, थोरले माधवराव पेशवे ह्यांच्या कारकीर्दीत मराठे सरदारांनीं रोहिलखंड पादाक्रांत करून पुनः तेथें आपली सत्ता संस्थापित करण्याचा यत्न केला; त्या वेळींही सुजाउद्दौला इंग्रजांस अनुकूल होऊन त्यानें त्यांच्या प्रगतीस पुष्कळ अडथळा केला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सुजाउद्दौल्यानें बक्सार येथील लढाईत अपयश आल्यानंतर आपल्या सैन्याची सुधारणा करण्याकडे विशेष लक्ष्य घातलें. फ्रेंच लोकांच्या साहाय्यानें त्यानें आपल्या सैन्यास चांगली कवाईत शिकवून तें इंग्रज सैन्याच्या बरोबरीचें केलें. बक्सारच्या लढाईतही त्यास अपयश आलें नसतें, परंतु त्याचे गोलंदाज लोक फितूर होऊन त्यांनीं तोफांमध्यें दारूगोळ्यांच्या ऐवजीं गवताच्या पेंड्या भरल्या, त्यामुळें त्यास अपयश आलें. सुजाउद्दौल्यानें आपल्या कारकीर्दीत इतकीं राजकारणें केलीं व इतके रक्तपात केले तरी त्यानें न्यायपद्धति व वसुलाची व्यवस्था चांगली ठेवून प्रजेस संतुष्ट केलें होतें. फ्रांक्लिन नामक इतिहासकारानें सुजाउद्दौल्याबद्दल असें लिहिलें आहे कीं, "तो अत्युत्तम न्यायाधीश असून त्याच्या अंगीं निःपक्षपातपणा हा गुण चांगला वसत होता, आणि त्याच्या हृदयांत स्वराज्योत्कर्षाची इच्छा नेहमीं जागृत होती." जोनाथन स्कॉट ह्या इतिहासकारानें त्याची ह्यापेक्षांही विशेष स्तुति केली आहे. तो लिहितोः—"राजा ह्या नात्यानें तो शाहणा व प्रौढ होता, व खाजगी गृहस्थ ह्या नात्यानें तो फार सुशील, दयाळू व उदार होता. त्याजवर त्याच्या प्रजेचें अत्यंत प्रेम होतें. एवढेंच नव्हे, तर त्याच्या शत्रूस देखील तो प्रिय असे. रोहिल्यांचा पुढारी हाफिज रहिमतखान ह्याच्या पुत्रांनीं त्याची मृत्युवार्ता ऐकून डोळ्यांतून आंसवें गाळिलीं." सुजाउद्दौला ह्याचें हिंदु व मुसलमान ह्यांवर सारखें प्रेम होतें. त्याचा मुख्य दिवाण

राजा वेणीबहादूर नामक एक हिंदु गृहस्थ होता. त्याचप्रमाणें पंडित काशीराज, गणेश वेदांती वगैरे महाराष्ट्र ब्राह्मण मुत्सद्दी त्याच्या पदरीं होते. ह्यानें मृत्युसमयीं आपलें राज्य व खजिना बापाच्या-पेक्षां दुप्पट वाढवून ठेविला होता. स्वतःच्या कल्याणाकरितां ह्यानें मराठ्यांशीं जरी कृतघ्नपणा केला, तरी मराठ्यांविषयीं त्याचें चांगलें मत असे. मराठ्यांसही सुजाउद्दौल्याचें सामर्थ्य माहित असून त्यांच्या दरबारांत सुजाउद्दौल्याचें बरेंच वजन असे. मराठ्यांचे पराक्रमी सरदार विसाजी कृष्ण बिनिवाले ह्यांनीं ज्या वेळीं रोहिल्यांचा सूड उगवून, शहाअलम बादशहास सुजाउद्दौल्यापासून हस्तगत करून घेतलें; त्या वेळीं थोरल्या माधवराव पेशव्यांनीं त्यांस स्वदस्तुरचें पत्र लिहून त्यांचें अभिनंदन केलें, व सुजाउद्दौल्यासारख्या मातबर सरदाराची कांहीं मात्रा चालूं दिली नाहीं म्हणून त्यांची स्तुति केली. इंग्रज लोकही सुजाउद्दौल्याच्या स्नेहाचें महत्त्व लक्ष्यांत घेऊन त्याशीं सलोख्यानें वागत होते. त्यांनीं, सुजाउद्दौल्याशीं स्नेह करून, रोहिले व मराठे ह्यांच्या राजकारणांत त्याची मदत घेतली नसती, तर इतिहासास निराळें स्वरूप प्राप्त झालें असतें. असो.

सुजाउद्दौल्याचें लग्न सफदरजंग ह्याचे कारकीर्दींत इ० स० १७४३ मध्यें झालें. त्याच्या बायकोचें नांव भाऊ बेगम असें होतें. ही स्त्री त्याच्या पाठीमागें जीवंत होती. हिजपासून वॉरन हेस्टिंग्ज ह्यानें सक्तीनें द्रव्य घेतल्यामुळें ही सुप्रसिद्ध वक्ता बर्क याच्या पार्लमेंटांतील जोरदार भाषणानें सर्व जगास ज्ञात झाली आहे. हिचा पुत्र मिर्झा अमानी हा सुजाउद्दौल्याचे पश्चात् असफउद्दौला हें नांव धारण करून अयोध्येच्या गादीवर बसला.




**ASUF-UD-DAULA.**

**असफउद्दौला.**

**(इ० स० १७७५—इ० स० १७९७).**

# भाग ५ वा.

## असफउद्दौला.

( इ० स० १७७५—इ० स० १७९७ ).

सुजाउद्दौला मृत्यु पावला त्या वेळीं त्यास वडील मिर्झा अमानी व धाकटा सादतअल्ली असे दोन पुत्र होते. त्यांपैकीं मिर्झा अमानी हा असफउद्दौला हें नांव धारण करून अयोध्येच्या गादीवर बसला. हा राज्याधिकार चालवूं लागला त्या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता हिंदुस्थानांत बरीच वाढली जाऊन, तिनें अयोध्येवर आपला चांगलाच पगडा बसविला होता. दिल्लीचा बादशहा निर्बल व परतंत्र झाल्यामुळें मध्यवर्ती सार्वभौम सत्तेचा लोप झाला व दक्षिणेंतील मराठ्यांचा उत्कर्ष होऊं लागला. परंतु महाराष्ट्रसत्तेस विरोध करून तिच्या संघशक्तीचा भंग करावा, आणि स्वतःचा फायदा करून हिंदुस्थानचें साम्राज्य आपणास प्राप्त करून घ्यावें, ह्या उद्देशानें पाश्चिमात्य राष्ट्रांची त्या वेळीं जी खटपट झाली, तींत दिल्लीपतीच्या आश्रयानें निर्माण झालेल्या व स्वातंत्र्योत्कर्षानें प्रबल व धनाढ्य बनलेल्या ह्या अयोध्या संस्थानाचें त्यास चांगलें साहाय्य झालें, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. ईस्ट इंडिया कंपनीच्या तर्फे ह्या वेळीं वॉरन हेस्टिंग्ज हे हिंदुस्थानामध्यें गव्हरनर जनरल असून त्यांचें सर्व लक्ष्य स्वसत्तेची अभिवृद्धि करण्याकडे व तत्प्रीत्यर्थ लागणारें द्रव्य संपादन करण्याकडे विशेष होतें. ह्या वेळीं त्यांस अयोध्यासंस्थान हें उत्तम खाद्य सांपडून त्यांना त्यावर चांगला हात मारितां आला. नबाब असफउद्दौला ह्याची कारकीर्द म्हणजे वॉरन हेस्टिंग्ज ह्यांच्या अक्षम्य स्वार्थपटुतेचें प्रदर्शन आहे. त्यांस ह्या वेळीं अनावर लोभ उत्पन्न झाल्या-

मुळें त्यांनीं ज्या कृति आचरण केल्या या अत्यंत गर्हणीय व तिरस्करणीय अशाच होत्या. संस्कृत सुभाषितामध्यें लोभाचा परिणाम वर्णन केला आहे:—

लोभः प्रतिष्ठा पापस्य प्रसूतिर्लोभ एव च ।
द्वेषक्रोधादिजनको लोभः पापस्य कारणम् ॥ १ ॥
लोभात्क्रोधः प्रभवति लोभात्कामः प्रजायते ।
लोभान्मोहश्च नाशश्च लोभः पापस्य कारणम् ॥ २ ॥

ह्याप्रमाणें पाहिलें तर पापाचें कारण जो लोभ तो जेथें निर्माण झाला, तेथें अत्यंत अनाचार घडून यावेत ह्यांत कांहीं नवल नाहीं. असफउद्दौला याच्या कारकीर्दीत वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं केलेलें अयोध्येचें द्रव्यहरण व बेगमांवर केलेले अत्याचार प्रसिद्धच आहेत. त्याचें विस्तृत वर्णन करण्याच्या भरीस न पडतां असफउद्दौल्याच्या राजकीय चरित्रांतील अगदीं ठोकळ ठोकळ गोष्टी संक्षेपेंकरून खालीं दिल्या आहेत.

असफउद्दौला गादीवर बसला त्या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीनें सुजाउद्दौल्याशीं केलेला दोस्तीचा तह रद्द केला आणि अयोध्येचे रेसिडेंट मि० ब्रिस्टो यांनीं एक नवीन तहाचा मसुदा पसंत केला. त्यामध्यें मुख्यत्वेंकरून उभयपक्षांमध्यें स्नेह राहावा; नबाबानें कंपनीच्या संमतीवांचून युरोपियन लोक नौकरीस ठेवूं नयेत; दिल्लीच्या शहाअलम बादशहानें नबाबाविरुद्ध इंग्रजांस किंवा इंग्रजांविरुद्ध नबाबास कांहीं गोष्टी सांगितल्यास तिकडे उभयतांनीं लक्ष्य देऊं नये; कोरा व अलाहाबाद हे जिल्हे कंपनीनें नबाबाच्या अंमलांत द्यावेत; आणि बनारस, जानपूर, गाझीपूर आणि चेतसिंग राजाच्या ताब्यांतील सर्व मुलूख मिळून २२ लक्षांचा प्रांत नबाबानें कंपनीस द्यावा; इंग्रज सैन्याचा दरमहा खर्च सुजाउद्दौल्याचे कार-

कीर्दीत २,१०,००० ठरला होता, तो आतां २,६०,००० करावा; सुजाउद्दौल्याच्या कारकीर्दीत कंपनीच्या करारांपैकीं जी बाकी देणें राहिली असेल ती सर्व नबाबानें द्यावी; आणि कंपनीनें नबाबाच्या प्रांताचें संरक्षण करावें; ह्याप्रमाणें कलमें असून तीं ता० २१ मे इ० स० १७७५ रोजीं असफउद्दौला ह्यानें मान्य केलीं. ह्यानंतर कंपनीचें अयोध्येस "परमनंट ब्रिगेड" म्हणून जें इंग्रज सैन्य होतें त्याशिवाय "टेंपररी ब्रिगेड" म्हणून जादा सैन्य आणखी ठेविलें, व त्याचा सर्व खर्च नबाबावर लादला.

मि० ब्रिस्टो हा वॉरन हेस्टिंग्जच्या विरुद्ध पक्षाचा होता. त्यानें असफउद्दौला ज्या अर्थीं लखनौच्या गादीचा मालक झाला त्याअर्थीं संस्थानची सर्व संपत्ति त्याच्या स्वाधीन करणें अवश्य होतें. परंतु तसें न करितां, त्याची आई भाऊ बेगम हिच्याताब्यांत सर्व संपत्ति दिली व तिला एक मोठी स्वतंत्र जहागीर तोडून दिली. त्यामुळें अर्थात् त्या उभयतांचें वांकडें येऊन, असफउद्दौल्यास आईजवळून द्रव्य घेणें भाग पडलें. त्याप्रमाणें त्यानें ६२ लक्ष रुपये घेतले. तेव्हां त्याच्या आईनें रेसिडेंटाकडे तक्रार केली. त्या वेळीं रेसिडेंट मि० ब्रिस्टो ह्यांनीं ता० १९ आक्टोबर इ० स० १७७९ रोजीं असफउद्दौल्याकडून आईस त्रास देणार नाहीं असा कौलनामा लिहून घेऊन उभयतांचा वाद मिटविला. असफउद्दौल्याची आई भाऊ बेगम ही फैजाबाद येथें राहत असे व तेथेंच अयोध्येचे नबाबही राहत असत; परंतु ह्या वादापासून असफउद्दौल्यानें आपलें राहण्याचें ठिकाण लखनौ येथें बदललें व तेथेंच आपली राजधानी केली. भाऊ बेगम ही फैजाबाद व अयोध्या ह्या दोन स्थळीं राहून आपला जहागिरीचा स्वतंत्र रीतीनें बंदोबस्त करीत असे व तेथें ती आपल्या टंकसाळा चालवून नाणें पाडीत असे. तिच्या आश्रयास दोन हजार

लोक होते. तिला ब्रिटिश रेसिडेंटाचें अभय मिळाल्यामुळें आतां कोणाचेंही भय राहिलें नाहीं.

ह्यानंतर सहा वर्षेंपर्यंत लखनौचा राज्यकारभार असफउद्दौल्यानें सुरळीत रीतीनें चालविण्याचा यत्न केला; परंतु इकडे नबाबाच्या लष्करामध्यें युरोपियन अधिकाऱ्यांचा फार भरणा करून व मन मानेल त्याप्रमाणें नबाबाच्या सैन्यांत ढवळाढवळ करून इंग्रज रेसिडेंटानें अयोध्येंत एकसारखा गोंधळ उडवून दिल्यामुळें तेथे कोणत्याही तऱ्हेची शिस्त राहिली नाहीं. एतद्देशीय सैन्य बेदिल होऊन त्यानें बंड केलें. असफउद्दौल्यानें आपल्या हातून कारभार निभण्याची आशा नाहीं असें पाहून, तो आपला दिवाण मूर्तिजाखान ह्याच्या ताब्यांत दिला. त्यामुळें बेदिल सैन्याचा अधिपति खोजा बसंत ह्यानें असफउद्दौल्याचा धाकटा भाऊ सादतअल्ली ह्यास गादीवर बसविण्याचा विचार करून मूर्तिजाखान ह्यास ठार मारिलें. त्यामुळें अयोध्येंत बरीच गडबड उडून ती बंद करण्यास असफउद्दौल्यास पुष्कळ त्रास पडला. शेवटीं हेस्टिंग्जच्या मर्जीतला माणूस हैदरबेगखान ह्यास असफउद्दौल्यानें अयोध्येचा दिवाण नेमून राज्यामध्यें कशी तरी शांतता केली.

ह्या सगळ्या भानगडींत सैन्याचा खर्च व कंपनीची बाकी अतिशय तुंबत चालली. सुजाउद्दौल्याचे कारकीर्दींत सैन्याचा खर्च २५॥ लक्ष रुपये कंपनीस द्यावा लागत असे, तो वॉरन हेस्टिंग्जच्या विरुद्ध कौन्सिलनें ३१$\frac{2}{3}$ लक्ष केला. त्यामध्यें पुन: "टेंपररी ब्रिगेड" व इतर नवीन अधिकाऱ्यांचे पगार वगैरे बाबी वाढत वाढत जाऊन एकंदर रक्कम फारच फुगत चालली. इ० स० १७७५ पासून इ० स० १७८१ पर्यंत सहा सात वर्षांत कंपनीस फक्त ७० लक्ष रुपये पोहोंच होऊन दोन कोटी दहा लक्ष रुपये बाकी नबाबाकडे थकली. त्यामुळें त्याची फारच त्रेधा उडाली. त्यास स्वत:च्या

नौकर लोकांस पगार देण्यास किंवा नातेवाईक लोकांस तैनाती देण्यासही पैसा मिळेनासा झाला. राजवाड्यांतील स्त्रियांना उपास-मार होऊं लागली. अशी स्थिति खुद्द नबाबाची झाली असतांना अयोध्येमध्यें वसुलाच्या कामावर नेमले युरोपियन लोक प्रांताचा वसूल नबाबाच्या खजिन्यांत न पाठवितां स्वतःच्या खिशांत भरून आपलाच तळीराम गार करूं लागले. मार्शमनच्या इतिहासांत कर्नेल हॅने नामक एका गृहस्थाचें उदाहरण फारच चमत्कारिक दिलें आहे. इ० स० १७७८ मध्यें ह्या इसमास बाहरैच, गोंडा व गोरखपूर ह्या प्रांतांच्या जमाबंदीच्या कामावर नेमिलें होतें. तो इ० स० १७७८ पासून इ० स० १७८१ पर्यंत तीनचार वर्षांच्या अवधींत ३० लक्ष रुपये खिशांत घालून चालता झाला. तो पुनः १७८१ मध्यें अयोध्येस येणार असें ऐकून नबाब असफउद्दौला अगदीं घाबरून गेला व त्यानें वॉरन हेस्टिंग्ज ह्यांस त्यास पुनः न नेमण्याबद्दल विनंति केली; एवढेंच नव्हे तर तो पुनः जर आला तर आपण राज्यांत न राहतां गव्हरनर जनरलजवळ जाऊन राहूं असें कळविलें.* तात्पर्य, स्वेच्छाचारी युरोपियन लोकांचा अयोध्येमध्यें सुळसुळाट झाल्यामुळें त्यांनीं जमीनदार लोकांकडून वाटेल तसा पैसा घेतला,

---

* मि. आयर्व्हिन यांनीं नबाबाच्या पत्राचा उतारा आपल्या पुस्तकांत दिला आहे तो वाचण्यासारखा आहे:—

"Colonel Hannay is inclined to request your permission to be employed in the affairs of this quarter. If, by any means, any matter of this country dependent on me should be entrusted to the Colonel, I swear by the holy Prophet that I will not remain here, but will go from hence to you. From your kindness, let no concern dependent on me be entrusted to the Colonel."

—*Garden of India, page 90.*

व्यापार सुरू केला, आणि जकातीचा वसूलही आपणच करूं ला
त्यामुळें अयोध्येचा वसूल अगदीं कमी झाला. ही सर्व मा
मि० आयर्व्हिन व सर हेन्री लॉरेन्स ह्या लेखकांनीं दिली
तेव्हां ती असत्य किंवा अविश्वसनीय मानणेंही जरा कठीण
असो.

नबाब असफउद्दौला ह्यानें राज्याची अशी स्थिति झालेली
इ० स० १७७८ मध्यें इंग्रज सैन्य व राज्यांतील इंग्रज का
कमी करण्याबद्दल गव्हरनर जनरल ह्यांस अर्ज केला. परंतु त्य
विनंतीचा उपयोग इ० स० १७८१ पर्यंत कांहींच झाला
नंतर इ० स० १७८१ सालीं वॉरन् हेस्टिंग्ज ह्यांनीं चुनार
असफउद्दौल्याची भेट घेतली, आणि ता० १९ सप्टेंबर रोजीं
ठरविलें कीं, अयोध्येच्या इंग्रज सैन्यापैकीं फक्त एक कंपू व
जादा पलटण ठेवून बाकीचें सर्व इंग्रज सैन्य नबाबाच्या राज्य
दुसरीकडे न्यावें; आणि ज्या अर्थी लष्करी अधिकाऱ्यांच्या प्राब
मुळें व जहागीरदारांच्या विस्तृत जहागिरीमुळें नबाबाच्या रा
फार आपदा उत्पन्न झाली आहे, त्या अर्थी त्या जहागिरी
कराव्या, व त्यांपैकीं कंपनीनें ज्यांची हमी घेतली आहे त
वसूल रेसिडेंटाचे मार्फत पोहोंचता करावा.

हा तह झाला त्या वेळीं कंपनीच्या खजिन्याची स्थिति अत्यंत
होती. ती सुधारण्याकरितां वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं नबाबास प
करारनामे रद्द करून वाटेल त्या तऱ्हेनें ९९ लक्ष रुपये रोख व
लक्ष रुपयांची रक्कम कांहीं दिवसांनीं, देण्याबद्दल मागणें केलें.
हेस्टिंग्ज ह्यांनीं काशीच्या चेतसिंग राजाशीं अतिशय जुलमाचें
केल्यामुळें काशी येथें इ० स० १७८१ च्या आगस्ट महि
बंड झालें. त्या बंडामध्यें अयोध्येच्या बेगमांचें अंग आहे असा

पुरावा वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं आपले मित्र सर इलाजा इम्पे ह्यांच्या मदतीनें तयार करून, त्यांच्या जहागिरी व संपत्ति जप्त करण्याचें काम सुरू केलें. बेगमांची जहागीर ३० लक्ष उत्पन्नाची होती, ती जप्त केली असतां कंपनीस पुष्कळ फायदा होईल अशा पापबुद्धीनें, ती असफ-उद्दौल्याकडून जप्त करविण्याचा निश्चय केला. ह्या सर्व गोष्टींस असफउद्दौल्याची मुळींच संमति नसून खुद्द लखनौचे रेसिडेंट मि० मिडल्टन ह्यांचीही त्याजकडून ही जप्ति सक्तीनें अमलांत आणण्याची इच्छा नव्हती. शेवटीं वॉरन हेस्टिंग्ज ह्यांच्या दुराग्रहामुळें त्यांना हें नीच कृत्य करणें भाग पडलें! "अयोध्येच्या जहागिरी, अन्यायानें, नबाबाच्या इच्छेविरुद्ध, जप्त केल्या म्हणून नबाबाचें मन उदास झालें व त्याची शरीरप्रकृति अगदीं क्षीण झाली." असा मजकूर खुद्द अयोध्येचे रेसिडेंट ह्यांनीं वॉरन हेस्टिंग्ज ह्यांस एका पत्रामध्यें लिहिला आहे. असफउद्दौल्यानें अखेरपर्यंत बेगमांच्या जहागिरींची व संपत्तीची जप्ती करावी म्हणून स्वतः हुकूम दिला नाहीं. शेवटीं मि० मिडल्टन ह्यांनीं लष्करी लोक बरोबर घेऊन फैजाबादेवर हल्ला केला, आणि गोमती नदीच्या कांठीं, आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस सुखानें क्रमीत असलेल्या, दोन राजस्त्रियांवर द्रव्यप्राप्तीस्तव त्यांनीं सक्ती केली. त्यांस मदत करण्यास वॉरन हेस्टिंग्ज ह्यांच्या मर्जीतला व त्यांच्याच कृपेनें अयोध्येचें प्रधानपद धारण केलेला सरदार हैदरबेगखान हा तत्पर झाला. नंतर त्या उभयतांनीं त्या पडदानशीन स्त्रियांवर व त्यांच्या वृद्ध द्वारसंरक्ष-कांवर अतिशय जुलूम करून त्यांच्याकडून ७६ लक्ष रुपये काढले. ह्या वेळीं त्यांनीं जे अत्याचार केले त्यांचें वर्णन, बेगमांचा कैवारी वाचस्पति बर्क ह्यानें पार्लमेंटपुढें जें केलें आहे, तें वाचून प्रत्येक सहृदय वाचकाच्या नेत्रांतून अश्रुधारा आल्यावांचून राहत नाहींत. त्या राजस्त्रियांचे क्लेश, त्यांचा मानभंग, त्यांची विटंबना, वगैरे गोष्टी

वॉरन हेस्टिंग्जच्या कीर्तीस अखंड कलंकदायक आहेत असें अनेक युरोपियन इतिहासकारांनींही प्रांजलपणें कबूल आहे.* असो.

अयोध्येच्या बेगमांचें द्रव्यहरण झाल्यानंतर अयोध्येच्या राज्याची सर्व व्यवस्था वॉरन हेस्टिंग्ज ह्यांचा हस्तक हैदरबेगखान याजकडे होती. त्यानें गव्हरनर जनरलच्या तंत्रानें चालून प्रजेपासून अतिशय जुलमानें पैसा काढिला. वॉरन हेस्टिंग्ज ह्यांच्या मर्जीतले रेसिडेंट मिडल्टन व पामर ह्यांनांही त्याचा तिरस्कार वाटूं लागला. तेव्हां त्यांच्यावर गव्हरनर जनरलची गैरमर्जी होऊन त्यानीं पुनः ब्रिस्टो ह्यास रेसिडेंट नेमिलें. ह्या वेळीं त्यास, दिवाण हैदरबेगखान ह्याच्या अनुमतानें चालण्याबद्दल गव्हरनर जनरलचा हुकूम झाला होता. पुनः एक वर्षानंतर ब्रिस्टोचें व गव्हरनर जनरलचें पटेनासें होऊन ब्रिस्टोस लखनौच्या रेसिडेन्सीचा राजीनामा देणें भाग पडलें. अशा रीतीनें वॉरन हेस्टिंग्ज ह्यांच्या कारकीर्दीत अयोध्येच्या राज्यकारभाराची

---

*अयोध्येच्या बेगमापासून द्रव्य हरण करण्यासाठीं वॉरन् हेस्टिंग्ज ह्यांनीं त्यांवर जे सक्तीचे व जुलमाचे उपाय योजिले त्यांचें वर्णन, आंग्लवक्ते बर्क व शेरिडन ह्यांनीं वॉरन हेस्टिंग्ज ह्यांच्या चौकशीच्या वेळीं फारच बहारीचें केलें आहे. त्यामध्यें लखनौचे रेसिडेंट मि० मिडल्टन ह्यांनीं द्रव्य प्राप्तीस्तव त्या पडदानशीन राजस्त्रियांचे व त्यांच्या नौकरांचे कसे हाल केले त्याचा करुणरसपूरित वृत्तांत दिला आहे. ह्या संबंधानें मि० मिल ह्यांनींही आपल्या इतिहासांत विस्तृत माहिती दिली आहे. मि० रॉबर्ट मांटगामरी ह्यांनींही बेगमांच्या वृद्ध व प्रामाणिक नौकरांच्या छलासंबंधाची हकीकत फारच हृदयद्रावक दिली आहे. ब्रिटिश सरकारचे स्तुतिपाठ गाणारे मेकाले सारखे मुत्सद्दीही ह्या संबंधानें वॉरन हेस्टिंग्जवर दोषारोप करण्यास कमी करीत नाहींत. तेव्हां अशा ब्रिटिश राष्ट्राच्या शुभ्र कीर्तीस कलंकास्पद गोष्टीची विस्तृत हकीकत निराळी देण्याचें आम्हांस प्रयोजन दिसत नाहीं. ज्यास ती वाचण्याची इच्छा असेल त्यांनीं वरील इंग्रजी ग्रंथ अवलोकन करावेत.

दुर्व्यवस्था होऊन सर्वत्र हाहाःकार उडाला. मि० ब्रिस्टो ह्यानें इ० स० १७८२ सालीं अयोध्येच्या स्थितीचें जें वर्णन केलें आहे त्यांत असें लिहिलें आहे कीं, "प्रांतोप्रांतींचे आमिल ऊर्फ फौजदार स्वेच्छाचारी होऊन आपापल्या ठिकाणीं स्वतंत्र राजेच बनले आहेत. त्यांची सत्ता अमर्यादित झाली असून, मन मानेल तो कायदा ते चालवीत आहेत. लखनौच्या दरबारचा त्यांवर बिलकूल धाक राहिला नसून सर्वत्र अव्यवस्था झाली आहे; आणि राज्यांत सुरक्षितपणा मुळींच राहिला नाहीं." ह्याच संबंधानें क्याप्टन एड्वर्ड्स ह्यानें असें म्हटलें आहे, "इ० स० १७७४ सालीं सुजाउद्दौल्याचे कारकीर्दींत अयोध्याप्रांत अतिशय भरभराटीमध्यें होता. परंतु इ० स० १७८३ मध्यें तो उध्वस्त व उच्छिन्न बनला." अशी स्थिति, केवळ ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्याचा अवाढव्य खर्च, रेसिडेंट व इतर युरोपियन अधिकारी ह्यांची द्रव्यापहारबुद्धि, आणि संस्थानच्या राज्यकारभाराची ढवळाढवळ ह्यांमुळें प्राप्त झाली.

अयोध्या संस्थानची अगदीं हीनदशा झाली व आतां निभाव लागत नाहीं असें पाहून, नबाब असफउद्दौला ह्यानें गव्हरनर जनरल ह्यांस अयोध्येवर काढलेला लष्करीखर्च कमी करण्याबद्दल विनंति केली. तेव्हां इ० स० १७८४ मध्यें, वॉरन हेस्टिंग्ज हे स्वतः लखनौस आले व त्यांनीं तेथील सैन्याची एक तुकडी कमी केली, व जप्त केलेल्या जहागिरीचा कांहीं भाग खुला केला. परंतु एवढ्यानें अयोध्येची स्थिति सुधारण्यासारखी नसल्यामुळें, नबाब असफउद्दौला ह्यानें आपल्या तक्रारी गव्हरनर जनरलकडे पाठविण्याचा क्रम एकसारखा सुरू ठेविला होता. इतक्यांत इ० स० १७८५ मध्यें गव्हरनर जनरल वॉरन हेस्टिंग्ज हे आपली चिरस्मरणीय कारकीर्द संपवून विलायतेस गेले व त्यांच्या जागीं लवकरच लॉर्ड कॉर्नवालिस हे गव्हरनर

जनरल होऊन आले. नबाब असफउद्दौला ह्यानें पुनः त्यांस आपल्या संस्थानाची दुःस्थिति सादर केली. त्यानें, "इ० स० १७७४ पासून इ० स० १७८३ पर्यंत सुमारें ९ वर्षांत दोन कोटी तीस लक्ष रुपये कंपनीच्या लष्करी खर्चाबद्दल दिले. मूळ इ० स० १७७५ चा ठराव वार्षिक ३१,२०,००० रुपयांचा होता, तो बदलून इ० स० १७८१ मध्यें ३४,२०,००० रुपये देण्याचें मान्य केलें; परंतु युरोपियन लोकांचा निरनिराळा खर्च मिळून ८४,००,००० रुपये कंपनीस द्यावे लागतात. ते देण्याची अयोध्या संस्थानची आतां ताकद राहिली नाहीं;" वगैरे सर्व गोष्टी लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांस निरनिराळ्या प्रकारानें सांगितल्या. तेव्हां त्यांस नबाबाची दया येऊन त्यांनीं ता० १९ एप्रिल इ० स० १७८७ मध्यें नवीन तह केला व त्यांत सैन्य कमी करण्याचें जरी मान्य केलें नाहीं, तरी सर्व लष्करी खर्च ५० लक्ष रुपयावर मुक्रर केला, आणि ब्रिटिश रेसिडेंटानें संस्थानच्या अंतर्गत राज्यकारभारांत बिलकूल हात घालूं नये असें ठरविलें. ह्या तहानें नबाब असफउद्दौला ह्यास अल्पसा तरी सैन्याचा खर्च कमी झाला असें वाटून, त्यानें गव्हरनर जनरलच्या म्हणण्याप्रमाणें ५० लक्ष रुपये देण्याचें मान्य केलें; व मागील बाकीपैकीं कांहीं रक्कम कंपनीच्या पदरांत घातली.

ह्यानंतर एक वर्षानें–म्हणजे ता० २९ जुलई इ० स० १७८८ मध्यें, पुनः व्यापारसंबंधीं आणखी एक तहनामा झाला. त्या वेळीं जकातीसंबंधानें उभय पक्षांस फायदेशीर अशीं कांहीं कलमें ठरलीं. ह्याच समयीं लखनौ येथें गव्हरनर जनरलचा एजंट म्हणून जो अधिकारी सालीना १० लक्ष रुपये नेमणुकीवर होता त्याची जागा कमी केली; आणि कंपनीच्या नांवाखालीं कित्येक युरोपियन व्यापाऱ्यांना अयोध्येमध्यें जे हक्क प्राप्त झाले होते ते सर्व काढून घेतले. तात्पर्य, लॉर्ड

कॉर्नवालिस ह्यांनीं मागील गव्हरनर जनरल ह्यांच्या जुलमामुळें अयोध्येची जी दुर्धर स्थिति झाली होती ती सुधारण्यास नबाब असफ-उद्दौला ह्यास बरीच मोकळीक करून दिली ह्यांत शंका नाहीं.

नबाब असफउद्दौला ह्यास लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांच्याकडून उत्तेजन मिळतांच त्यानें अयोध्येची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न केला. परंतु एक तपपर्यंत एकसारखी झालेली अव्यवस्था अल्पकाळांत दूर करणें त्यास सुसाध्य नव्हतें. त्यांतून तो विशेष कर्तव्यदक्ष व राजकारस्थानपटु नसल्यामुळें त्यास अधिकारी लोकांचे जुलूम एकदम बंद करणें शक्य नव्हतें. तथापि त्यानें राज्यकारभाराकडे बरेंच लक्ष्य घातलें व आपल्याकडून होईल तितका चांगला यत्न केला. त्यानें महाराज टिकायतराय नांवाचा एक चतुर मुत्सद्दी आपला खाजगी दिवाण करून त्यास संस्थानच्या अंतर्गत सुधारणेची कामगिरी सांगितली. महाराज टिकायतराय हा एक कायस्थ जातीचा हिंदु असून असफउद्दौल्याच्या दरबारांत फार प्रतिष्ठा पावला होता. हा फार उदार, दीनवत्सल व धर्माभिमानी असा पुरुष होता. ह्यानें लखनौ येथें चांगली सुधारणा करून 'टिकायत गंज' व 'टिकायत राय बाजार' वसविला. त्याचप्रमाणें ह्यानें आपल्या नांवानें 'टिकायत गंज' व 'टिकायत नगर' अशीं दोन गांवें बाराबंकी जिल्ह्यामध्यें वसविलीं. ह्यानें बांधलेला एक घांट काशी येथें प्रसिद्ध आहे. हा सद्गृहस्थ इ० स० १८०० मध्यें मृत्यु पावला. टिकायतराया-प्रमाणें महाराज झौलाल म्हणून एक दुसरा हिंदु मुत्सद्दी असफउद्दौल्याचा कोशाध्यक्ष होता. हाही फार प्रसिद्ध पुरुष असून त्याच्या नांवानें लखनौ येथील वजीरगंजामध्यें "झौलाल" नांवाचा बाजार अद्यापि चालत आहे. अशा रीतीनें दोन प्रसिद्ध हिंदु मुत्सद्दी आपल्या दरबारांत घेऊन असफउद्दौल्यानें अयोध्येची सुधारणा कर-

ण्याचा यत्न केला व त्यांत त्यास अंशतः यश आलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

नवाब असफउद्दौला हा स्वतः फार चैनी, विषयासक्त, आणि दानशूर असल्यामुळें त्याचा खाजगी खर्च फारच अवाढव्य होता. त्याच्या दानशूरत्वाची कीर्ति फार विलक्षण असे. लखनौ प्रांतांतील लोक असें सांगतात कीं, "त्याची स्वारी शहरांत कधीं कधी फिरावयास निघत असे. तेव्हां एखादे वेळेस, रस्त्यांत कोणी सुस्वरूप व सुलक्षणी असा भिकारी आढळून त्याचे मर्जीस आला म्हणजे तो त्यास आपले बरोबर राजवाड्यांत नेऊन, प्रथम त्याजकडून उंची पोषाग करवून, नंतर त्यास एक सुस्वरूप स्त्री करून देई; आणि त्यास पुष्कळ दौलत देऊन निरंतरचे उपजीविकेस कांहीं उत्पन्नही करून देई; आणि लोकांनीं त्यास बहुमान द्यावा म्हणून त्यास आपले खासे मंडळींत दाखल करून 'नवाब' असा किताब देई. यावरून लोकांमध्यें:—

"जिसको न दे मौला, तिसको दे असफउद्दौला"

अशी म्हण पडली आहे.* हिचा अर्थ असा कीं, "ज्यास मौला म्हणजे ईश्वर देत नाहीं, त्यास असफउद्दौला देतो." ह्यावरून त्याच्या दानशूरत्वाची कल्पना करितां येईल.

नवाब असफउद्दौला जरी असा खर्चिक व डामडौली होता तरी त्याचें लक्ष्य सार्वजनिक व लोकोपयोगी कामाकडे विशेष होतें. ह्यानें लखनौ येथें अनेक पेठा वसवून मोठमोठे प्रेक्षणीय व भव्य

* चिंचुरकर यांच्या "तीर्थयात्राप्रबंध" ह्या पुस्तकांत हें वर्णन सुजाउद्दौल्यास लाविलें आहे, परंतु ती चूक आहे. हें वर्णन असफउद्दौल्याच्या दानशूरत्वाचें आहे.

राजवाडे बांधिले. ते सांप्रत लखनौ शहरास भूषणभूत झाले असून त्यांपैकीं दौलतखाना, रुमाई दरवाजा, हुसनबाग, बिबियापूर कोठी, चिनहुत कोठी, ऐषबाग, चारबाग, व इमामवाडा इत्यादि सुंदर राजमंदिरें व उद्यानभूमिका अद्यापि प्रेक्षक जनांस आनंद देत आहेत. ह्यापैकीं इमामवाडा व रुमाई दरवाजा ह्या दोन इमारती त्यानें केवळ दरिद्री जनांच्या उदरपोषणाकरितां बांधिल्या. त्या संबंधानें अशी आख्यायिका सांगतात कीं, इ० स० १७८४।८५ ह्या वर्षी अयोध्येमध्यें जो दुष्काळ पडला, त्या वेळीं असफउद्दौल्याचा वजीर रेजा हुसनखान व दिवाण महाराज टिकायतराय ह्यांनीं, दुष्काळपीडित मध्यम स्थितींतल्या लोकांच्या सोयीसाठीं, हुजूर परवानगीनें रात्रीं मशाली लावून, हीं कामें त्यांच्याकडून करवून घेतलीं.

नबाब असफउद्दौला ह्यानें ईस्ट इंडिया कंपनीचा प्रचंड लष्करी खर्च भागवून आपल्या कारकीर्दीच्या अखेरीस लखनौचें वैभव वाढविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला होता. त्याची महत्त्वाकांक्षा हैदराबादचा निजाम व म्हैसूरचा टिपु सुलतान ह्यांच्या राज्यवैभवापेक्षां आपलें वैभव अधिक वाढवावें अशी फार होती. त्यानें आपल्या राजधानींत हत्ती व जवाहीर फार विकत घेतलें होतें, आणि त्याचें प्रदर्शन करण्याकडे त्याची प्रवृत्ति जास्त असे. फोर्बस साहेबानीं त्याच्या वैभवसंपन्नतेची व डामडौलाची एक चमत्कारिक गोष्ट लिहिली आहे. ती येणेंप्रमाणें:—"नबाब असफउद्दौला ह्यानें आपला मुलगा वजीरअल्ली ह्याचें लग्न फारच थाटानें केलें. त्याचे लग्नांत नुसते १२०० शृंगारलेले हत्ती वरातीपुढें चालत होते. नवऱ्या मुलाच्या अंगावर २० लक्षांचें जवाहीर होतें. व त्याच्या चौपट किंमतीचें जवाहीर खुद्द नबाबाच्या अंगावर होतें. ह्या लग्नसमारंभाचे वेळीं लखनौच्या प्रख्यात इमारती तयार नव्हत्या म्हणून मुद्दाम दोन तंबू

तयार केले होते. ते भरगच्ची असून त्यांचें काम अप्रतिम कला-कुसरीचें केलें होतें. त्या प्रत्येक तंबूची कांबी १२० फूट आणि रुंदी व उंची ६० फूट असून त्या प्रत्येकाची किंमत ५ लक्ष रुपये होती!!" असफउद्दौल्याच्या वैभवाचें असेंच वर्णन हॉज नामक प्रवाशानेंही फार मौजेचें केलें आहे. ह्यावरून असफउद्दौल्याची अशी विपुल संपत्ति पाहून पाश्चात्यांचे नेत्र दिपून जावेत आणि ईस्ट इंडिया कंपनीची अपहारबुद्धि जागृत राहावी ह्यांत मनुष्य स्वभावाच्या विरुद्ध असें कांहीं दिसत नाहीं.

नबाब असफउद्दौला ह्याजबरोबर लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांनीं जो तह केला त्या तहाप्रमाणें बरेच दिवस सुरळीत राज्यव्यवस्था चालली, व नबाबानें बरींच लोकोपयोगी कामें करून प्रजेचा असंतोष नाहींसा करण्याचा यत्न केला. परंतु इ० स० १७९९ मध्यें लॉर्ड कॉर्न-वालिस ह्यांची मुदत पुरी होऊन सर जॉन शोअर हे हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल होऊन आले. ह्यांनीं नबाबाच्या खजिन्याची स्थिति बरीशी नाहीं असें पाहून लखनौ येथें स्वतः आगमन केलें; आणि नबाबास चांगला उपदेश करून त्याच्या राज्याचा नीट बंदो-बस्त व्हावा म्हणून आणखी इंग्रज सैन्याचीं दोन पलटणें अयोध्येस ठेवल्याबद्दल त्याची कबुली मिळविली, व इंग्रज सैन्याचा खर्च सालीना ५॥ लक्ष रुपये आणखी अयोध्येच्या खजिन्यावर लादला! ह्याच वेळीं सर जॉन शोअर ह्यांनीं अयोध्येचा दरबारवकील तफ-झुल हुसेन ह्यास असफउद्दौल्याचा मुख्य प्रधान केलें. ही व्यवस्था असफउद्दौल्याच्या इच्छेविरुद्ध असून, त्याच्या मनांत अलमासअली खान नामक अनुभवी व शहाण्या मुत्सद्यास त्या पदावर आरूढ कर-ण्याचा विचार होता. परंतु सत्तेपुढें शहाणपण नसल्यामुळें, त्यास गव्हरनर जनरल साहेबांच्या इच्छेप्रमाणें वागणें भाग पडलें.

असफउद्दौल्याच्या इच्छेविरुद्ध पुनः लष्करीखर्च व अप्रिय दिवाण नेमल्यामुळें त्याच्या मनास एक प्रकारें धक्का बसला व तो लवकरच आजारी पडला. ह्या दुखण्यांत त्यानें औषधपाणी कांहीं घेतलें नाहीं. शेवटीं तो ता० २१ माहे सप्टंबर इ० स० १७९७ रोजीं मृत्यु पावला.

असफउद्दौल्याच्या मागून त्याचा एकुलता एक मुलगा वजीरअल्ली हा अयोध्येच्या गादीवर बसला. असफउद्दौल्याची बायको बेगम शमसुन्निसा ही त्याच्या पश्चात् बरेच दिवस जीवंत होती. तिला ८७,१६३ रुपये तनखा मिळत असे. ती इ० स० १८१३ मध्यें मृत्यु पावली.

# भाग ६ वा.

## वजीरअल्ली व सादतअल्ली.

( इ० स० १७९७—इ० स० १८१४ ).

असफउद्दौला मृत्यु पावल्यानंतर अयोध्येच्या गादीबद्दल तंटा उत्पन्न झाला. असफउद्दौला ह्यास वजीरअल्ली म्हणून एक औरस पुत्र होता. तो गादीचा खरा वारस असल्यामुळें त्यास गादी मिळणें रास्त होतें. त्याप्रमाणें हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल सर जॉन शोअर ह्यांनीं त्यास गादीवर बसविण्याबद्दल परवानगी दिली. व त्याप्रमाणें त्यास राज्याभिषेकही झाला. परंतु असफउद्दौल्याचे कारकीर्दींत गव्हरनर जनरलच्या मेहेरबानीनें अयोध्येच्या प्रधान-पदावर आरूढ झालेला गृहस्थ तफझुल हुसेन ह्यास ती गोष्ट पसंत पडली नाहीं. तो सुजाउद्दौल्याचा दुसरा पुत्र सादतअल्ली ह्याचा पुष्कळ दिवस शिक्षक असल्यामुळें, त्याचा मनोदय आपल्या शिष्यास अयोध्येचें राज्यपद देऊन आपण त्याच्या वतीनें स्वतंत्रपणें राज्य-कारभार चालवावा असें फार होतें. तेव्हां त्यानें वजीरअल्लीवर नानाप्रकारचे असत्य आरोप आणून त्याजविषयीं गव्हरनर जनरलचें मन कलुषित केलें. त्यामुळें गव्हरनर जनरल ह्यांस ह्या गोष्टीचा विचार करणें भाग पडून ते लखनौस येण्यास निघाले. त्यास तफझुल हुसेन हा सामोरा गेला; व त्यानें वजीरअल्ली हा अस्सल पुत्र नसून, तो व्यसनी व उधळ्या आहे; आणि त्याचें मन इंग्रजां-विषयीं अराजनिष्ठ आहे वगैरे गोष्टी सांगून, सादतअल्लीस गादीवर बसविण्याबद्दल त्यांची मनधरणी केली. त्याचा परिणाम गव्हरनर जनरलच्या मनावर चांगला होऊन, त्यांनीं वजीरअल्लीस पदच्युत



**SADAT-ALI KHAN.**

**सादतअलीखान.**

( इ० स० १७९७—इ० स० १८१४

करून सादतअल्लीस गादीवर बसविण्याचा निश्चय केला. सादतअल्ली हा असफउद्दौल्याचे कारकीर्दीत खोजा बसंत ह्याच्या दंग्यापासून काशीस जाऊन राहिला होता व त्यास दीड लक्ष रुपये पेनशन मिळत होते. त्यास काशीचे रेसिडेंट मि० चेरी ह्यांनीं गादीवर बसविण्याचा विचार कळवून व त्याजबरोबर नवीन तहाचा ठराव करून लखनौ येथें आणिलें. तेथें सर जॉन शोअर ह्यांनीं ता० २१ जानेवारी इ० स० १७९८ रोजीं बिबियापूर राजवाड्यामध्यें मोठा दरबार भरवून सादतअल्ली ह्यास राज्याभिषेक केला; आणि वजीरअल्लीस गादीवरून दूर केलें. नंतर त्यास चांगल्या बंदोबस्तानें काशी येथें पाठविलें व तेथें त्यास सादतअल्लीचें पूर्वीचें पेनशन दीड लक्ष रुपये देऊन नजरकैदेंत ठेविलें. ह्या राज्यक्रांतीमुळें लखनौ येथें बरीच धामधूम उडाली, तथापि सर जॉन शोअर ह्यांनीं मोठ्या शहाणपणानें ती शांत केली. वजीरअल्लीस पदच्युत केल्यामुळें इंग्रजांविषयीं त्याचें मन फार संतप्त झालें. व कांहीं दिवसांनीं त्याचा क्रोधाग्नि प्रज्वालित होऊन, त्यानें इ० स० १७९९ मध्यें काशी येथें मोठें बंड केलें. त्या बंडामध्यें काशीचे रेसिडेंट मि० चेरी हे मारले गेले, व वजीरअल्लीचा पराभव होऊन तो इंग्रजांच्या हातीं सांपडला. त्यांनीं त्यास कलकत्ता येथील 'फोर्ट उइल्यम' ह्या किल्ल्यामध्यें सक्त कैदेंत ठेविलें. तेथें तो बरेच दिवस होता. नंतर पुढें त्यास वेलोर येथें टिपुसुलतानाच्या पुत्राकरितां बांधलेल्या राजकीय कारागृहामध्यें नेलें. तेथें तो हतभागी राजपुत्र इ० स० १८१७ मध्यें मृत्यु पावला. ह्याच्या लग्नखर्चास असफउद्दौल्यानें ३० लक्ष रुपये खर्च केके होते, परंतु तो मृत्यु पावल्यानंतर त्याच्या कफनास अवघा ७० रुपये खर्च लागला! ह्याचें नांव नशीबाची लीला!! असो.

सादतअल्लीस गादीवर बसविल्यानंतर ता० २१ फेब्रुवारी इ० स० १७९८ रोजीं इंग्रजांचा व त्याचा नवीन तह ठरला. तो येणेंप्रमाणेंः—

"तह लखनौ नबाब सुजाउद्दौला बहादूर व असफउद्दौला बहादूर यांचा व इंग्रज कंपनी बहादूर यांचे कित्येक तह उभय सरकारचे प्रयोजनार्थ झाले होते; म्हणून नबाब वजीरउलमुमालीक व अमीनउद्दौला व निजामउल्मुल्क सादतअल्लीखान बहादूर मुबारकजंग यांनीं व बंगाला लाट सर जॉन शोअर ब्यारोनेट कंपनी बहादूर यांचे विद्यमानें, पूर्वीपासून जी दोस्ती आहे ती दोस्ती पुढें सदा चालवावी व त्या दोस्तीचें फळ उभयतांनीं अनुभवीत जावें, याजकरितां हा तह केला.

१ लें कलमः—पूर्वीं उभय सरकारची जी दोस्ती आहे ती पुढें सदा चालवावी. नबाब सादतअल्लीखान बहादूर याचे दोस्त व दुस्मान इंग्रजांस सारखे, व इंग्रजांचे दोस्त व दुस्मान ते सादतअल्लीखान यास सारखे. आणि उभयतांनीं कबूल केलें कीं, पूर्वींचे जे तह आहेत ते या तहास विरोध न येतील ते सर्व मंजूर असें या तहापासून ठरलें आहे.

२ रें कलमः—ह्या तहापासून कंपनी सरकारांनीं कबूल केलें होतें कीं, नबाबास कोणी शत्रू होईल त्याचें पारिपत्य करून नबाबाचा मुलूख आबाद राखीत जाऊं. याजकरितां व इंग्रजांनीं आपल्या मुलखाचे संरक्षणाकरितां फौज व तोफा व पायदळ व स्वार वगैरे वाढविले आहत म्हणोन, पेशजीं नबाब असफजहाउद्दौला बहादूर हे रुपये ५६,७७,६३८ दरसाल देत होते. ते हल्लीं फौज वाढविली आहे याजकरितां हल्लीं नबाबांनीं रुपये १९,२२,३६२ वाढवून दिले. एकूण पेशजीचे व हल्लींचे रुपये शहात्तर लक्ष अयोध्याशिक्का भावाप्रमाणें दरसाल इंग्रजांस देत जावे.

३ रें कलमः—सन १७९८ माहे जानेवारी ता० २१ रोजीं नबाब सादतअलीखान बहादूर यास राज्याभिषेक झाला, त्या दिवसापासून अखेरसालपावेतों, साल दरसाल शहात्तर लक्ष रुपये देत जावें. नबाबांनीं कबूल केलें कीं, दरमहाचे दरमहा हप्तेबंदीप्रमाणें शहात्तर लक्ष तेहतीस हजार तीनशें एकूणचाळीस रुपये पांच आणे चार पैसे दरमहाचे दरमहा आम्हीं इंग्रजांस देत जाऊं. यांत चुकणार नाहीं.

४ थें कलमः—पूर्वीचे कित्येक रुपये बाकी राहिले आहेत, ते राज्याभिषेक झाला त्या दिवसापर्यंत हिशेब करून, नबाबांनीं कबूल केलें कीं रुपये देऊं.

५ वें कलमः—नबाबांनीं कबूल केलें कीं वजीर अलीखान यास दरसाल एक लक्ष पन्नास हजार रुपये देऊं व दरमहा त्याबद्दल बारा हजार पांचशें रुपये इंग्रजांकडे देत जाऊं. वजीर अलीखान इंग्रजांचे मुलुखांत राहील तोंपर्यंत त्यास ते देत जातील.

६ वें कलमः—खानदानी लोक, बेगम साहेब व सखेसोयरे बनारसेमध्यें आहेत, त्यांचे खर्चाकरितां रुपये दोन लक्ष चार हजार दरसाल व फरकाबादेंत कित्येक लोकांस खर्चाकरितां तेवीस हजार सहाशें अडतीस रुपये, एकूण परभारा इंग्रजांनीं शहात्तर लक्षांत देत जावें.

७ वें कलमः—इंग्रज कंपनी बहादूर यांचे स्थानीं बंगाला लाट सर जॉन शोअर यांनीं कबूल केलें कीं, अयोध्येमध्यें आम्हीं ठेवूं ती फौज दहा हजार माणूस असामी कमी होऊं देणार नाहीं. इंग्रज फौज व हिंदु स्वार, पायदळ व तोफखानासुद्धां दहा हजार कमी होणार नाहीं. कदाचित् तेरा हजारावर जास्त फौज ठेवावी लागेल. ते वेळेस नबाबांनीं कबूल केलें कीं तो ज्यास्ती खर्च आम्ही देऊं. कदाचित् इंग्रजांची फौज आठ हजारांत कमी झाली तर शहात्तर लक्षांत कमी फौजेचा ऐवज वजा करून द्यावा.

८ वें कलमः—इंग्रजांस ठाण्यास अयोध्येंत किल्ला नाहीं, याजकरितां नबाबांनीं इंग्रजांचे दोस्तीचा विश्वास धरून त्यांस अलहाबाद किल्ला सरंजामसुद्धां व घांट व मैदान जमीन भोंवतालची सुद्धां इंग्रजांस दिला. इंग्रजांनीं कबूल केलें कीं घांटाचा पैका दरसाल वसूल करून नबाबास देत जाऊं. नबाबांनीं कबूल केलें कीं अलाहाबाद किल्ला नीट बांधावयाकरितां आठ लक्ष रुपयेपर्यंत इंग्रजांस देऊं. हे रुपये किल्ला बांधण्यास सुरुवात केली म्हणजे दोन वर्षांत खर्चास देऊं. आणि नबाबांनीं कबूल केलें कीं, फत्तेगड किल्ला बांधावयास सुद्धां इंग्रज कंपनी यांस सहा महिन्यांत तीन लक्ष रुपये अगाऊ देऊं.

९ वें कलमः—कदाचित् नबाबांच्या मुलुखाचा अधिक बंदोबस्त व्हावा याजकरितां कानपुरांत व फत्तेगडांत इंग्रजांची फौज आहे ती तेथून काढावी लागली व त्यापेक्षां अधिक उपयोगी जाग्यांत ठेवावी लागली, तरी ते वेळेस नबाबांनीं दुसरे जागीं फौज येईल तिचा खर्च द्यावा.

१० वें कलमः—नबाबास राज्याभिषेक करून मुलूख दिला त्याबद्दल इंग्रजांस बहुत श्रम झाले याजकरितां नबाबांनीं कबूल केलें कीं बारा लक्ष रुपये तुम्हांस देऊं. त्याप्रमाणें ते द्यावे.

११ वें कलमः—दुसरे व तिसरे कलमाप्रमाणें नबाबांनीं कबूल केलेले रुपये हप्तेबंदीप्रमाणें वेळेवर देत जावें. कदाचित् समयावर पैका पावला नाहीं व बाकी राहिली तर ये विसींची निशा जामीन द्यावा. पुढेंही सालोसाल बाकी न राही त्याची निशा द्यावी.

१२ वें कलमः—नबाबाचा व इंग्रजांचा तह झाल्यापासून फौजेचा खर्च अधिक वाढला आहे व कित्येक जास्ती खर्च जमेपेक्षां करावा लागतो; याजकरितां नबाबाच्या अनहिताकडे जो खर्च असेल

तो कमी व्हावा. ह्याकरितां कंपनी सरकारास विचारून ज्यांत नबाबाचें हित होईल त्याप्रमाणें बंदोबस्त करावा.

१३ वें कलमः—कंपनी सरकारचें व नबाबाचें राजकारण एकच आहे; उभयतांत भेद नाहीं; म्हणून नबाबाचे व परक्या मुलखाचे राजकारण जाबसाल करावे लागले तरी नबाबांनीं इंग्रजांस विचारल्यावांचून परक्या मुलखाशीं राजकारण जाबसाल करूं नये. याप्रमाणें नबाबांनीं कबूल केलें.

१४ वें कलमः—इंग्रजांचा व नबाबांचा सौदागिरीविषयीं तह झाला होता, परंतु त्याप्रमाणें आजपावेतों सौदागिरी नबाबाचे मुलखांत नीट चालली नाहीं. यास्तव उभयतांनीं कबूल केलें आहे कीं आजपासून सौदागिरी तहाप्रमाणें चालेल.

१५ वें कलमः—नबाबांनीं कबूल केलें कीं, अठरा टोपीवाल्यांत कोणालाही आम्ही चाकरीस लावणार नाहीं, व कंपनीच्या मर्जीशिवाय आमचे मुलखांत राहूं देणार नाहीं.

१६ वें कलमः—नबाबांनीं कबूल केलें कीं, आमचे बंधूचे पुत्रास आमचे राज्यांत घेऊं व त्याचें संरक्षण करूं.

१७ वें कलमः—नबाब वजीरउलमुमालिक सादतअलीखान बहादूर यानीं कबूल केलें कीं आमचे वंशपरंपरा आम्हीं हा तह बिघाड न होय असा चालवूं. कंपनीचे स्थानीं गव्हरनर जनरल बंगाला लाट सर जॉन शोअर यानीं कबूल केलें कीं, हा तह कलमीं बिघाड न होय असा आम्हीं चालवूं. आणि उभयतांनीं कबूल केलें कीं, उभयतांचा दोस्ती संबंध व उभयतांच्या मुलखाचा संबंध व उभयतांच्या रयतेचा संबंध या तहापासून जो होईल तो कदापि मोडणार नाहीं. उभय सरकारचे राजकारण जाबसाल एकविचारें चालवूं. नबाबाचा संबंध व अधिकार, आपलें खानदान व जमीन व देणें घेणें व रयत व फौज यांवर राहील. इंग्रजांचा त्याशीं संबंध राहणार नाहीं.''

ह्या तहामुळें ईस्ट इंडिया कंपनीस सैन्याच्या खर्चाबद्दल सालीना २० लक्ष रुपयांची अधिक रक्कम मिळून अलाहाबाद व फत्तेगड हे दोन बळकट किल्ले व त्यांच्या दुरुस्तीकरितां ११ लक्ष रुपये आणि सादतअल्लीच्या राज्यारोहणाकरितां झालेला १२ लक्ष रुपये खर्च मिळून एकंदर पुष्कळच फायदा झाला.

सादतअल्ली ह्यास अयोध्येची गादी सुदैवानें प्राप्त झाली, परंतु त्याच्या आगमनानें प्रजेचेंही दैव उघडलें. सादतअल्ली हा सुजा-उद्दौल्यासारख्या रंगेल नबाबाचा पुत्र होता, त्यामुळें त्यास बापाप्रमाणें थोड्याशा राजविलासाच्या संवई लागल्या होत्या. तथापि त्याच्या ठिकाणीं राज्यकारभार चालविण्याचें सामर्थ्य उत्तम प्रकारें वसत असून अयोध्येचीं राज्यसूत्रें त्याच्या हातीं येतांच त्याची राज्यकर्तृत्वशक्ति व्यक्त होऊं लागली. अल्पकालामध्ये त्यानें प्रजानुरंजन करून लोक-प्रियता संपादन केली. सादतअल्ली गादीवर बसला त्या वेळीं त्याचें वय चाळीस वर्षांचें होतें. तो नेहमीं प्रसन्नमुख होता. त्यास गादीवर येण्यापूर्वीं शिकारीचा व मदिरेचा थोडा नाद होता, परंतु तो विचारशील व मितव्ययी असल्यामुळें तो त्या व्यसनांत गर्क झाला नाहीं. तो गादीवर बसल्यानंतर त्यास आपली जबाब-दारी पूर्ण, समजूं लागली, व त्यानें सुखोपभोगास रजा देऊन आपलें सर्व लक्ष्य राज्यकारभाराकडे लाविलें. त्यानें आपल्या धर्माप्रमाणें 'हजरत आबास 'च्या मशिदीमध्यें जाऊन संसारसुखाचा त्याग केला आणि राजकर्तृत्व अंतःकरणपूर्वक करीन अशी शपथ घेतली. ती त्यानें अखेरपर्यंत पाळण्याचा यत्न केला. परंतु त्यास ब्रिटिश सरकाराकडून मध्यंतरीं—विशेषतः त्याच्या कारकीर्दीच्या प्रारंभास-बरेच अडथळे आले, त्यामुळें त्याचा पुष्कळ निरुत्साह झाला.

सादतअल्ली गादीवर बसला त्या वेळीं सर जॉन शोअर हे गव्ह-

रनर जनरल होते. ते इ० स० १७९८ मध्यें विलायतेस जाऊन त्यांच्या जागीं लॉर्ड वेलस्ली हे आले. त्या समयास अहमदशहा अबदाल्लीचा मुलगा जमानशहा हा उत्तर हिंदुस्थानावर स्वारी करणार अशी एक बातमी पसरली होती. त्याकरितां सैन्याची तजवीज करण्याकडे लॉर्ड वेलस्ली ह्यांचें विशेष लक्ष्य लागलें. त्यांनीं प्रथमतः लखनौ हें उत्तरेकडील प्रांताचें एक नाकें समजून, तेथील बंदोबस्त करण्यास प्रारंभ केला; आणि एकदम इंग्रजी लष्कर तेथें पाठवून दिलें. आणि सादतअल्लीस लखनौ येथील खाजगी सैन्य ८०,००० होतें तें कमी करून, त्या ऐवजीं ब्रिटिश सैन्य ठेवण्याबद्दल व त्याचा खर्च संस्थानांतून देण्याबद्दल तगादा चालविला. सादतअल्लीनें ता० २१ जानेवारी इ० स० १८०० रोजीं लखनौचे रेसिडेंट कर्नल स्कॉट ह्यांच्या मार्फत गव्हरनर जनरल ह्यांस एक विस्तृत पत्र पाठवून, पूर्वीच्या तहाप्रमाणें अयोध्येवर ब्रिटिश सैन्य आणखी कादणें अन्यायाचें आहे वगैरे मजकूर फार लीनतेनें व स्नेहभावानें लिहिला. परंतु तो लॉर्ड वेलस्ली ह्यांस अप्रिय वाटून त्यांनीं आपला हेतु पूर्ण करण्याचा हट्ट धरिला. सादतअल्लीनें ब्रिटिश सैन्याचा खर्च देण्यास आपणास सामर्थ्य नाहीं असें कळविलें. त्यावरून गव्हरनर जनरल ह्यांनींही त्यास राज्यकारभार करण्याचें 'सामर्थ्य नाहीं' असें ठरविलें. शेवटीं उभयतांचा बराच पत्रव्यवहार होऊन, अखेर ता० २२ जानेवारी इ० स० १८०१ रोजीं, लॉर्ड वेलस्ली ह्यांनीं सादतअल्लीनें गादीवरून दूर व्हावें, किंवा नवीन तह करून आमचें म्हणणें कबूल करावें, असा अखेरचा खलिता पाठविला. सादतअल्लीनें पुष्कळ आढेवेढे घेतले, परंतु सार्वभौम सत्तेपुढें त्याचा निरुपाय होऊन तीस हार जाणें त्यास भाग पडलें. लॉर्ड वेलस्ली ह्यांनीं ता० १० नोव्हेंबर इ० स० १८०१ रोजीं आपले बंधु हेन्री

वेलस्ली ह्यांस लखनौ येथें पाठविलें. त्यांनीं सादतअल्लीबरोबर नवीन तह करून त्याजकडून सैन्याच्या खर्चाकरितां फरुकाबाद, मैनापुरी, इटावा, कानपूर, फत्तेगड, अलहाबाद, अजीमगड, बास्ती, गोरख-पूर, वगैरे मिळून १,३९,००,००० रुपये वसुलाचा प्रांत ईस्ट इंडिया कंपनीकडे सर्व हक्कांसह तोडून घेतला; व इतःपर नबाबास सैन्याचा खर्च निराळा द्यावा लागणार नाहीं व बाकीचा प्रांत साद-तअल्लीकडे वंशपरंपरा चालविला जाईल असें ठरविलें. येणेंप्रमाणें तीन वर्षेपर्यंत ज्या मतलबाकरितां सादतअल्लीस त्रास व मानहानि हीं सोसावीं लागलीं तो लॉर्ड वेलस्ली ह्यांचा मतलब सिद्धीस जाऊन, अयोध्येचें अर्धें राज्य ईस्ट इंडिया कंपनीच्या पदरांत पडलें, आणि सादतअल्ली राजकीय वेदनांतून मुक्त झाला.

ह्यानंतर इ० स० १८०१ पासून इ०स० १८१४ पर्यंत सुमारें बारा तेरा वर्षें, सादतअल्लीस अयोध्येच्या राज्यकारभाराकडे लक्ष्य पुरविण्यास शांतता प्राप्त होऊन, त्यानें आपली कारकीर्द प्रजेस सुखावह होईल असा यत्न केला. त्यानें चांगले चांगले मुत्सद्दी व शहाणे लोक आपल्या दरबारामध्यें ठेविले, व प्रथमतः सर्व प्रांताची पहाणी करून जमीन-महसुलाची सुरळीत व्यवस्था लाविली. नबाब व ब्रिटिश कंपनी ह्यांच्या वादांत जे जमीनदार प्रबल होऊन राजकीय खंडणी देईना-तसे झाले होते, त्यांची खोड मोडून त्यांच्याकडून नियमानें वसूल येईल अशी तजवीज केली. त्यानें 'इजाऱ्याची पद्धति' बंद करून तिच्या ऐवजीं 'अमानी' म्हणून एक नवीन पद्धति सुरू केली. त्याचप्रमाणें, न्यायपद्धतींत सुधारणा करून प्रजेस योग्य न्याय मिळेल असा बंदोबस्त केला. तात्पर्य, सादतअल्लीच्या कारकीर्दींत अयोध्येच्या राज्याची चांगली व्यवस्था होऊन त्यास सुस्थिति प्राप्त झाली. कर्नल म्याक् अंड्रयु ह्यांनीं सादतअल्लीच्या कारकीर्दीसंबंधानें असें लिहिलें

आहे कीं, "त्याच्या एकंदर राज्यव्यवस्थेमुळें लोक फार सुखी व संतुष्ट झाले. राज्यांतील पड जमिनीची लागवड झाली आणि दाट वस्तीच्या प्रांतांतून जमीनमहसूल द्रव्यरूपानें घेण्याची पद्धति अमलांत आली. एकंदरींत, सादतअल्लीनें आपल्या पश्चात् 'रयतेचा मित्र' अशी कीर्ति मिळवून राज्याचा खजिना पूर्णपणें भरून ठेविला." कर्नल स्लीमन ह्यांनीं सादतअल्लीच्या शहाणपणाची फारच तारीफ केली आहे. ते लिहितातः—"सादतअल्ली चांगला कर्तृत्ववान् पुरुष होता. तो ब्रिटिश हिंदुस्थानांतील युरोपियन अधिकाऱ्यांशीं मिळून मिसळून वागत असल्यामुळें राज्यकारभाराच्या कामांत चांगला निष्णात झाला होता. त्याला राज्यांतील लोकांचा स्वभाव, त्यांची समाजघटना आणि त्यांच्या गरजा ह्यांची पूर्ण माहिती झाली होती. तो मनुष्याच्या गुणांची पारख करण्यांत हातखंडा असून, योग्यस्थानीं योग्य माणूस नेमून त्यावर उत्तम प्रकारें देखरेख करण्याची हातोटी त्यास विशेष साधली होती. सादतअल्लीचे नौकर लोक त्यावर राजी असून, ते आपलें काम इमानें इतबारें बजावीत असत. सादतअल्लीनें त्यांस त्यांच्या गुणांप्रमाणें जहागिरी व इनामें देण्याचा क्रम ठेविला होता." सादतअल्लीचा मुख्य दिवाण मनोवरउद्दौला हा असून हकीम मेहेंदी हा एक थोर पुरुष त्याच्या दरबारांत सल्लामसलत देत असे. त्याचा खाजगी दिवाण दयाशंकर म्हणून एक हिंदु गृहस्थ होता. त्यानें इ० स० १८१० मध्यें जमिनीच्या पाहणीचें काम उत्कृष्ट रितीनें करून जमिनीच्या उत्पन्नाप्रमाणें योग्य आकार बसविला. त्यामुळें नबाबाचा फार फायदा झाला. तात्पर्य, ज्या सादतअल्लीस लॉर्ड वेलस्ली ह्यांनीं, इ० स० १८०१ मध्यें, 'राज्य करण्यास असमर्थ' असें ठरवून राज्यावरून दूर करण्याचा निश्चय केला होता, तोच सादतअल्ली इ० स० १८१४ मध्यें, राज्यकार-

भारांतील ब्रिटिश सरकाराची किंवा रेसिडेंटाची भानगड बंद झाल्यामुळें 'उत्तम राज्यकर्ता' ठरला. ह्यावरून शहाण्या व कर्तृत्ववान् संस्थानिकास स्वतंत्र रीतीनें राज्यकारभार चालविण्याची संधि मिळाली असतां त्याचे खरे गुण प्रदर्शित होऊन, प्रजेस सुख होतें व संस्थानचें कल्याण होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सादतअल्ली ह्यानें आपल्या कारकीर्दींत दिलाराम, दिलखुष, मुसाबाग, ह्य्यतबक्ष, नूरबक्ष कोठी, खासबाजार, हजरत आबासचा दर्गा वगैरे अनेक इमारती बांधल्या. तथापि त्याचा खर्च माफक असल्यामुळें त्यास आपल्या खजिन्यांत पुष्कळ पैसा शिल्लक ठेवितां आला. त्याच्या मृत्युसमयीं अयोध्येच्या खजिन्यांत १४ कोट रुपये शिल्लक होते. ह्यावरून त्याच्या राज्यकारभाराच्या व्यवस्थितपणाची कल्पना करितां येईल.

सादतअल्ली ता० ११ जुलई इ० स० १८१४ रोजीं मृत्यु पावला. त्याची पत्नी मुर्शिदज्यादी ही त्याच्या मागून कांहीं कालानें मृत्यु पावली. ह्या उभयतांचीं कबरस्थानें लखनौ येथें सांप्रत कयानिंग कॉलेजजवळ आहेत. सादतअल्ली ह्यास शमसुद्दौला व गाझीउद्दीन हैदर असे दोन पुत्र होते. ह्यापैकीं पहिला पुत्र त्याच्या हयातींतच मृत्यु पावला होता, त्यामुळें त्याच्या पश्चात् गाझीउद्दीन हैदर हा लखनौच्या गादीचा मालक झाला.



**GAZI-UD-DIN HYDER.**

**गाझीउद्दीन हैदर.**

(इ० स० १८१४—इ० स० १८२७).

# भाग ७ वा.

---

## गाझीउद्दीन हैदर.

(इ० स० १८१४—इ० स० १८२७).

**सादतअल्ली** मृत्यु पावल्यानंतर त्याचा दुसरा मुलगा **गाझीउद्दीन हैदर** हा गादीवर बसला. ह्याचें व ह्याच्या बापाचें बरेच दिवसांपासून वैमनस्य पडल्यामुळें तो त्याजपासून वेगळा राहत असे. त्यामुळें राजदरबारांतील चतुर व शहाण्या लोकांचा त्याशीं विशेष समागम न होतां, तो खुषमस्करी करणाऱ्या व स्तुतिस्तोत्र गाणाऱ्या नौकरलोकांचा अंकित झाला होता. त्यास गादी प्राप्त होतांच त्यानें **सादतअल्लीच्या** वेळचा राजकारस्थानपटु मुत्सद्दी **हकीम मेहेंदी** ह्यास कमी करून, त्याच्या जागीं आपला खानसामा **आगा मीर** ह्यास प्रधानगिरी सांगितली. हाच **आगा मीर** पुढें **महतमद्उद्दौला** ह्या नांवानें प्रसिद्धीस आला. ह्यानें अयोध्येच्या संपत्तीचा पुष्कळ अपहार केला व आपल्या धन्यास सर्व प्रकारें लुटलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. असो. **गाझीउद्दीन हैदर** गादीवर बसला त्या वेळीं **कर्नल बेली** हे लखनौचे रेसिडेंट होते, व **लॉर्ड मोयरा ऊर्फ लॉर्ड हेस्टिंग्ज** हे हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल होते. लखनौचा नबाब **सादतअल्ली** ह्याशीं इ०स० १८०१ सालीं जो तह झाला, त्याच्या योगानें नबाबाचा पुष्कळ प्रांत कंपनीच्या ताब्यांत गेला होता; व तेव्हांपासून अयोध्येच्या अंतर्गत राज्यव्यवस्थेंत ब्रिटिश सरकारास हात घालण्यास कांहीं प्रयोजन न राहून, संस्थानची राज्यव्यवस्थाही सुरेख चालली होती. त्यामुळें **गाझीउद्दीन हैदर** ह्याच्या कारकीर्दींत संस्थानच्या राज्यव्यवस्थेंत फेरफार करण्यास ब्रिटिश सरकारास तादृश कारण

कोणतेंच नव्हतें. तथापि, नबाबाच्या खजिन्यामध्यें द्रव्य फार असल्यामुळें त्याचा विनियोग करण्याचा प्रसंग त्यास लवकरच आला.

इ०स० १८१४ सालीं जी नेपाळची लढाई चालली होती तिच्या खर्चासाठीं पैशाची फार अडचण पडली. तेव्हां लॉर्ड मोयरा ह्यांनीं नबाब गाझीउद्दीन हैदर ह्याजपासून शेंकडा सहा टक्के व्याजाप्रमाणें एक कोट रुपये कर्ज घेतलें; परंतु तेवढ्यानें खर्च न भागल्यामुळें पुनः आणखी एक कोट रुपये घेतले, व त्याच्या तारणाकरितां नेपाळच्या पायथ्याचा पहाडी मुलूख व खैरीगड जिल्हा नबाबास गहाण लावून दिला. ह्या दोन कोटी रुपयांशिवाय नबाबानें आपला रिसाला व पुष्कळ हत्ती ब्रिटिश सरकारच्या मदतीस स्वतःच्या खर्चानें पाठविले होते. नबाबानें असें उत्कृष्ट साहाय्य केल्यामुळें गव्हरनर जनरल ह्यांनीं त्यावर संतुष्ट होऊन, त्याच्या औदार्याबद्दल व इंग्रजांविषयींच्या निस्सीम भक्तीबद्दल त्याचे फार फार आभार मानिले; व लवकरच त्याच्या उपकाराची चांगली फेड केली.

इ० स० १८१९ मध्यें दिल्लीचा बादशहा इंग्रजांविषयीं अराबनिष्ठ आहे असें वाटल्यावरून, त्याची बादशहात कमी करून लखनौच्या नबाबास "बादशहा" हें पद द्यावें व त्यास त्याच्या समतोल करावें, ह्या उद्देशानें लॉर्ड हेस्टिंग्ज ह्यांनीं गाझीउद्दीन हैदर ह्यास मोठ्या समारंभानें "बादशहा" हें पद दिलें व त्याच्या नांवानें नाणें पाडण्याची परवानगी दिली. गाझीउद्दीन हैदर "नबाबाच्या" ऐवजीं "बादशहा" बनला; परंतु मुसलमान लोकांस हें पदांतर फारसें पसंत न पडून त्यांस दिल्लीच्या सर्ववंद्य गादीचा अपमान झाला, असें वाटलें. त्यामुळें गाझीउद्दीन हैदर ह्याच्या नवीन अधिकाराचा दर्जा लखनौच्या बाहेर फारसा प्रसिद्ध झाला नाहीं.

गाझीउद्दीन हैदर ह्यास "बादशहा" केल्यानंतर पुनः ब्रिटिश-

सरकारास इ० स० १८२५ मध्यें ब्रह्मदेशच्या लढाईच्या प्रसंगीं त्याच्या मदतीची जरूर पडली. ह्या वेळीं हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल लॉर्ड आम्हर्स्ट हे होते, व लखनौचे रेसिडेंट मि० रिकेट्स हे होते. त्यांनीं गाझीउद्दीन हैदर ह्यास लढाईचें वृत्त कळवून पैशाची मागणी केली. तो इंग्रजांचा पूर्ण हितचिंतक असल्यामुळें त्यानें त्यांस कांहीं शर्तीवर आणखी एक कोट रुपये देण्याचें मान्य केलें. हें संतोषवृत्त गव्हरनर जनरल साहेबांस कळतांच त्यांनीं ता० १४ आक्टोबर इ० स० १८२५ रोजीं गाझीउद्दीन हैदर ह्यास स्वदस्तुर पत्र लिहून त्याचें फार फार अभिनंदन केलें; आणि त्यानें आपली 'स्नेहवाटिका पूर्ण विकासित केली' म्हणून विशेष आनंद प्रदर्शित केला.*

---

* लॉर्ड आम्हर्स्ट ह्यांचें पत्र फारशी भाषेंत असून तें फार मनोरंजक असल्यामुळें त्यांतील थोडासा उतारा येथें मासल्याकरितां दिल्यावांचून आम्हांस राहवत नाहीं.

"This your offer has proved of essential service, and at the same time manifests your unfeigned attachment, as well as the interest you take in the welfare of the British Government, from among all the allies of which, I have further to assure you, your Majesty has carried off the golden ball of superiority. The ever-verdant and blooming garden of our mutual friendship has been refreshed and embellished, while the benefits and fruits of our amity, which have existed from days of yore, are impressed upon the heart of every Englishman, both here and in Europe, as indelibly as if they had been engraven upon adamat; nor will lapse of time or change of circumstances efface from the memory of the British nation so irrefragable a proof, so irresistable an argument of the fraternal sentiments of Your Majesty."—*The Spoliation of Oude*, Page 68.

ह्यानंतर गाझीउद्दीन हैदर ह्यानें इ० स० १८२६ मध्यें पुनः पन्नास लक्ष रुपये कंपनी सरकारास दिले, त्या वेळीं पुनः लॉर्ड आम्हर्स्ट ह्यांनीं त्याची फार प्रशंसा करून त्यास "औदार्याची खाण" ( MINE OF MUNIFICENCE ) असें नांव दिलें. तात्पर्य, गाझीउद्दीन हैदर ह्यानें ब्रिटिश सरकारास साहाय्य करण्यास बिलकूल आळस केला नाहीं.

गाझीउद्दीन हैदर ह्याच्या कारकीर्दींत, अयोध्येच्या इतिहासांत लिहून ठेवण्यासारख्या राजकीय महत्त्वाच्या गोष्टी कांहींच झाल्या नाहींत. जात्या तो प्रबुद्ध, निरुपद्रवी आणि शांत वृत्ति असा होता; परंतु तो स्वतः राज्यव्यवस्थेंत दक्ष नसून त्याचें सर्व लक्ष्य सुखोपभोगाकडे होतें; त्यामुळें सर्व राज्यकारभार दरबारचे मुत्सद्दी व सादतअल्लीच्या वेळचे प्रांतोप्रांतींचे अधिकारी ह्यांच्यावर अवलंबून होता. अर्थात् सर्व सत्ता नोकर लोकांच्या हातीं गेल्यामुळें पूर्वींच्या व्यवस्थेंत अंतर पडलें. सादतअल्लीनें 'अमानी' म्हणून जी वसुलाची नवीन पद्धति अमलांत आणिली होती ती बंद पडून, तिच्या जागीं पूर्ववत् 'इजारा' पद्धति चालू झाली. त्यामुळें संस्थानचा वसूल कमी होऊन तालुकदार व जमीनदार लोक पुनः प्रमत्त झाले; व ते स्वच्छंदानें वर्तू लागले. त्या योगानें राज्यव्यवस्थेची शिस्त बिघडून सादतअल्लीच्या वेळची शांतता नाहींशी झाली. तथापि त्याच्या कारकीर्दींत अयोध्येची स्थिति अगदीं शोचनीय झाली होती असें म्हणतां येत नाहीं.

बिशप हिबर नामक पाश्चात्य प्रवासी गाजीउद्दीन हैदर ह्याच्या कारकीर्दींत इ० स० १८२४ मध्यें लखनौस आला होता. त्यानें त्या वेळची राज्यस्थिति समक्ष पाहून तिचें वर्णन आपल्या प्रवास ग्रंथांत लिहून ठेविलें आहे, त्यावरून तिचें खरें स्वरूप व्यक्त होतें. "बिशप हिबर हा इ० स० १८२४ च्या आक्टोबर महिन्यांत

कानपुराहून लखनौस गेला. त्या[illegible] असें लिहिलें आहे कीं, "अयोध्येची राज्यव्यवस्था चांगली नसून सर्व प्रदेश निर्जन झाला आहे म्हणून आम्हीं ऐकिलें होतें, परंतु तशी वस्तुस्थिति नव्हती. शेतकरी लोक लढाऊ जातीचे असल्यामुळें हत्यारें बाळगून होते, तरी ते शांत व विनम्र असे आढळून आले. त्याचप्रमाणें खेडे-गांवांतून दुकानें वगैरे व्यवस्थित असून सर्व लोक सुखी व भरभराटींत आहेत असें दिसलें. एकंदरींत, सर्व प्रांत लागवड केलेला होता असें पाहून मला साश्चर्य आनंद वाटला." ह्याच प्रवाशानें खुद्द नबाबाची भेट घेऊन त्याचें वर्णन लिहिलें आहे, तें वाचनीय असल्यामुळें त्याचा सारांश खालीं दिला आहे.—

"अयोध्येचा नबाब हा जरासा उंच आहे. तो निःसंशय सौंदर्य-वान असून त्याचा चेहरा अद्यापि मोहक दिसतो. तो तरुण असून त्याच्या शरीरावर वार्धक्याची छाया अधिक दिसते. त्याचे कुरळे केंस व कल्लेदार मिशा अगदीं पिकल्या आहेत, व त्याचा वर्ण पूर्वी-पेक्षां फार काळसर झाला आहे.........त्यास पोषाकाची फार आवड असून तो त्यांतला मोठा मार्मिक आहे. त्याची चालचर्या फार सभ्य व मनोहर आहे............त्यास विद्येची अभिरुचि आहे. तो तत्त्वज्ञान व भाषाशास्त्र ह्यांमध्यें चांगला प्रवीण असून त्याची मोठ्या विद्वानांत गणना केली जाते. त्यास रसायनविद्या व शिल्प-विद्या ह्यांचाही थोडा नाद आहे. परंतु, हे राज्यकर्त्यांचे विषय नसल्यामुळें, ते त्यास राज्यकारभारापासून पराङ्मुख करण्यास मात्र कारण झाले आहेत. ह्याच्या गुणांवरून ह्याचें व इंग्लंडचा पहिला जेम्स राजा ह्याचें पुष्कळ सादृश्य जमतें. जेम्सराजाप्रमाणें हा स्वभावतः न्यायी व दयाळू आहे व ज्यांचा त्याजपाशीं प्रवेश होतो त्यांना तो अति प्रिय आहे. ह्यानें कधींही जुलमाचें किंवा अन्या-

याचें असें एकही कृत्य केलें नाहीं. ह्याचे दोष म्हटले म्हणजे त्याचा गैरशिस्त व उधळेपणाचा खर्च, त्याच्या दरबारांत प्रजेचा अप्रवेश, व त्याचा मर्जीतल्या माणसांवर फाजील विश्वास, आणि त्याची उपचार व मानमरातब ह्यांवर विशेष प्रीति हेच होत."*

बिशप हिबर ह्यानें केलेलें वर्णन हिंदुस्थानांतील एतद्देशीय संस्थानांत नेहमीं दृष्टीस पडण्यासारखें असल्यामुळें त्यांत व्याजोक्ति असेल असें मानतां येत नाहीं.

गाझीउद्दीन हैदर ह्यास आपल्या राज्यामध्यें अव्यवस्था होऊन वसूल जमा होत नाहीं, ही गोष्ट समजली नव्हती असेंही म्हणवत नाहीं. त्यानें बिशप हिबर ह्याजवळ असें बोलून दाखविलें कीं, "मी ब्रिटिश सरकारावर संपूर्ण विश्वास ठेविल्यामुळें माझ्या सर्व अडचणी उत्पन्न झाल्या आहेत. त्यांनीं माझें व माझ्या पूर्वजांचें, चांगलें सैन्य कमी करण्याबद्दल मन वळवून, आतां राजवाड्याच्या पाहऱ्यापुरतेही लोक शिल्लक राहूं दिले नाहींत. त्यामुळें आम्हांस आमच्या राज्याचा मागील वसूल, दुसऱ्याच्या मदतीवांचून, सक्तीनें करितां येत नाहीं."† त्यानें आणखी असेंही सांगितलें कीं, "मला कोणतीही राज्यसुधारणा करण्याबद्दल स्नेहभावानें सूचना केली तर मी तिकडे

---

* Bishop Heber's Indian Journals, vol. 1, Page 52.

† "He urges that all his difficulties have arisen from his entire confidence in the friendship of the Company. That they induced him and his ancestors to disband an excellent army, till they have become unable, without help, to enforce payment of their ancient revenues,............That he never has refused, and never will refuse, to give the best consideration in his power to any measures of reform which may be, in a friendly manner, proposed to him."—*Bishop Heber's Indian Journals.*

कधींहीं दुर्लक्ष्य करणार नाहीं." ह्यावरून तो अरसिक किंवा मूर्ख राज्यकर्ता होता असें म्हणणें कठीण आहे. मात्र त्यानें आपला सर्व राज्यकारभार आपला कारभारी आगा मीर ह्याच्या हातांत दिल्यामुळें त्याची विशेष अपकीर्ति झाली, व अयोध्येच्या राज्याचें नुकसान झालें, हें प्रांजळपणें कबूल करणें भाग आहे.

गाझीउद्दीन हैदर हा ता० २० आक्टोबर इ० स० १८२७ रोजीं मृत्यु पावला. त्यानें ईस्ट इंडिया कंपनीस एकंदर ३॥ कोट रुपये कर्जाऊ दिले होते. त्याच्या कारकीर्दींत त्यास राज्यसुधारणा करण्यास आवश्यक अशीं सर्व साधनें अनुकूल होतीं. त्याजवळ त्याच्या बापानें ठेविलेला विपुल पैसा होता, आणि त्यास कोणी प्रतिस्पर्धी नसल्यामुळें व इंग्रज सैन्य त्याच्या साहाय्यार्थ तत्पर असल्यामुळें त्यास गादी जाण्याचीही भीति नव्हती. तेव्हां अशा स्थितींत त्यास आपली कर्तृत्वशक्ति चांगली प्रगट करून प्रजेस संतुष्ट करितां आलें असतें! परंतु नुसत्या साधनांनीं कार्य होत नाहीं; त्यांची योजना करणारा योजकही चतुर असला पाहिजे.

---

# भाग ८ वा.

## नासिरउद्दीन हैदर.

(इ० स० १८२७–इ० स० १८३७).

गाझीउद्दीन हैदर मृत्यु पावल्यानंतर त्याचा मुलगा सुलेमानजहा हा नासिरउद्दीन हैदर हें नांव धारण करून लखनौच्या गादीचा अधिपति झाला. ह्याच्या कारकीर्दीपासून लखनौच्या वैभवास उतरती कळा लागली असें म्हणण्यास हरकत नाहीं. राजाचें मुख्य कर्तव्य जें प्रजापालन तें एकीकडे राहून ज्या ठिकाणीं विलास-रंग सुरू होतात, तेथें अवनतीस प्रारंभ होतो, असेंच मानिलें पाहिजे. नासिरउद्दीन हैदर ह्याच्या कारकीर्दीपासून लखनौच्या गादीवर राजकार्यप्रवीण व प्रजानुरंजनदक्ष असा महमद अल्लीशिवाय एकही पुरुष आला नाहीं. उलट, विषयलंपट, दुराचारी, अरसिक आणि मूढमति असेच नबाब एकापेक्षां एक वरचढ निर्माण झाले. त्यामुळें लखनौच्या राज्यलक्ष्मीस त्यांचा तिरस्कार वाटून तिनें त्यांचा त्याग करण्यास सुरुवात केली, असें म्हटलें तरी चालेल. नासिरउद्दीन ह्याची कारकीर्द म्हणजे अनाचार व दुष्कृति ह्यांचें साम्राज्य असून तींत इतिहासांत लिहिण्यासारख्या गोष्टी फारच थोड्या आहेत–किंबहुना नाहींत म्हटलें तरी चालेल. परंतु केव्हां केव्हां असच्चरित्रापासूनही बोध घेण्यासारखा असतो, असें समजून त्याच्या कारकीर्दीचा अल्पसा वृत्तांत येथें दिला आहे.

गाझीउद्दीन हैदर मृत्यु पावला त्या वेळीं लखनौच्या खजिन्यांत कमींत कमी दहा कोटी रुपये शिल्लक होते. ते नासिरउद्दीन ह्यास अनायासें प्राप्त झाले, आणि त्याजबरोबर त्याच्या वडिलाच्या वेळचा



**NASIR-UD-DIN HYDER.**

**नासिरउद्दीन हैदर.**

(इ० स० १८२७—इ० स० १८३७).

मुत्सद्दी आगा मीर हाही नासिरउद्दीनाची प्रधानगिरी करण्यास तयार झाला. हा पुरुष कांहीं अंशीं महाराष्ट्राच्या इतिहासांत प्रसिद्ध असलेल्या छत्रपति संभाजी महाराजांच्या कलुषा प्रधानासारखा होता. कलुषानें एकाच नृपतीचा नाश केला, पण ह्यानें दोघां नृपतींना व्यसनार्त करून राज्याचा विध्वंस केला. शेवटीं ह्याचा व नासिरउद्दीनाचा बेबनाव होऊन तो अयोध्येच्या राज्यांतून निघून गेला. त्या वेळीं त्यानें २९ कोटींची संपत्ति नेली असें म्हणतात. त्याच्यानंतर प्रधानपद फाझलअल्ली ह्यास मिळालें.* परंतु त्यावर लवकरच हुजूरची इतराजी होऊन, शेवटीं दिवाणगिरीचा अधिकार मेहेंदीअल्लीखान ऊर्फ हकीम मेहेंदी ह्यास प्राप्त झाला. दिवाण हकीम मेहेंदी हा स्वतंत्र व बाणेदार गृहस्थ असून त्यानें आपल्या कारकीर्दीत लखनौचा राज्यकारभार चांगल्या तऱ्हेनें चालविण्याचा यत्न केला. परंतु यजमान मूर्ख भेटल्यामुळें त्याचा कांहीं उपयोग न होऊन, त्यास त्यांच्या पुढें हात टेंकावे लागले. तथापि, त्यांतल्या त्यांत, कांहीं वर्षें हकीम मेहेंदी प्रधानपदावर आरूढ होता म्हणून अयोध्येच्या प्रजेचा निर्वाह लागला.

नासिरउद्दीन हैदर ह्याच्या चरित्राचें बरोबर वर्णन करणें कठीण आहे. ह्याच्या संबंधानें कांहीं ग्रंथकारांनीं फार प्रतिकूल व निंदाप्रचुर लेख लिहिले आहेत व कांहीं लेखकांनीं त्याचे गुणानुवादही वर्णन केले आहेत. ह्या दोन्ही प्रकारच्या लेखांचें समदृष्टीनें निरीक्षण केलें तरी शेवटीं नासिरउद्दीन ह्याच्या विषयीं फारसें अनुकूल मत बनत नाहीं. हा स्वभावतः निरुपद्रवी व उदारवृत्ति होता. ह्याचें इंग्रज लोकांविषयीं व त्यांच्या चालीरीतींविषयीं फार चांगलें मत असून त्यांचें अनुकरण करण्याकडे त्याचा फार कल असे. एवढेंच नव्हे, तर त्यानें स्वतः मिस् वाल्टर्स नामक एका युरोपियन स्त्रीचा अंगिकार करून

तिला मुकंदरा औलिया असें नांव दिलें होतें. ह्यानें आपल्या पूर्वजांचें रत्नखचित एतद्देशीय चालीचें सिंहासन बदलून, त्याच्या ऐवजीं एक हस्तिदंती खुर्ची तयार करून पाश्चात् तऱ्हेचा दरबार बनविला होता. तो युरोपियन लोकांचा सत्कार करण्याविषयीं तत्पर असे. इ० स० १८२७ सालीं लॉर्ड कॉंबरमियर हे लखनौस गेले होते. त्यांनीं त्याच्या आदरातिथ्याची तारीफ करून त्याच्या वैभवाचें फार वर्णन केलें आहे. त्या वेळीं त्यानें त्यांस आपली एक बहुमूल्य रत्नांनीं जडलेली व मोत्यांच्या व पाचेच्या सरांनीं सुशोभित केलेली तसबीर नजर केली होती.

ह्यानें दिल्लीच्या बादशाहाजादीशीं लग्न लाविलें असून तिचें नांव 'ताजमहाल' असें ठेविलें होतें. ही सौंदर्यलतिका 'ताजमहाल' ह्या नांवास शोभणारी असून तिचें यश आग्र्याच्या सुप्रसिद्ध ताजमहालच्या शुभ्र वर्णाप्रमाणें अकलंक होतें. तिचा पोषाख व रत्नालंकार इतके मूल्यवान व प्रेक्षणीय असत कीं, ते पाहून कोणाचेही नेत्र दिपून जात.* ह्याशिवाय अफझलमहाल, मलिकाझमानी, वगैरे स्वरूपसुंदर व यौवनसंपन्न स्त्रिया त्याच्या रंगमहालांत अग्रगण्य होत्या. ह्या

---

* हिच्या पोषाखाचें वर्णन मिस फयानी पार्क्स नामक एका आंग्लयुवतीनें केलें आहे. तें वाचलें म्हणजे नासिरउद्दीन हैदरच्या वैभवाची कल्पना वाचकांस करितां येईल.

"Her dress was of gold and scarlet brocade, and her hair was literally strewed with pearls, which hung down upon her neck in long single strings, terminating in large pearls, which mixed with and hung as low as her hair, which was curled on each side of head in long ringlets, like the Charles the Second's beauties. On her forehead she wore a small gold circlet, from which depended large pearls interspersed with emeralds. Above this was

मुख्य बेगमांच्या खर्चाकरितां, त्यानें ता० १ मार्च इ० स० १८२९ रोजीं, ईस्ट इंडिया कंपनीस शेंकडा पांच टक्के व्याजाप्रमाणें ६२,४०,००० रुपये कर्जाऊ दिले होते, व त्यांच्या व्याजापैकीं २६ हजारांची रक्कम त्यानें निराळी तोडून दिली होती.

नासिरउद्दीन ह्यानें सत्कृत्याकडेही कांहीं रक्कम खर्ची घातली होती. त्यानें ३ लक्ष रुपये शेंकडा ४ टक्के व्याजाप्रमाणें ब्रिटिश रेसिडेंटाच्या ताब्यांत देऊन त्यांचें जें व्याज येईल त्याचा विनियोग अनाथ अंधपंगू लोकांना दानधर्म करण्याकडे करावा, अशी तजवीज केली होती; व दरमहा तीन हजार रुपये लखनौ येथील पाठशाळेकडे लावून दिले होते. ह्याशिवाय त्यानें जागजागीं दवाखाने स्थापन करून गरीब लोकांकरितां अन्नछत्रें घातलीं होतीं. हींच त्याच्या सर्व आयुःक्रमांतील पुण्यकृत्यें होत.

नासिरउद्दीन हैदर ह्याचें खासगी चरित्र मि० उइल्यम नाइटन नामक त्याच्या पदरच्या एका युरोपियन चित्रकारानें लिहिलें आहे. ह्या पुस्तकास त्यानें "पूर्वेकडील राजाचें खाजगी चरित्र" ( Private Life of an Eastern king ) असें नांव दिलें आहे. त्यात त्यानें

---

a paradise plume, from which strings of pearls were carried over the head. She wore enormous gold ear-rings, to which strings of pearls and emeralds were attached, each pearl larger than the one above it. She had a nose-ring also, with large round pearls and emeralds; and her necklaces, were too numerous to be described. She wore long sleeves open at the elbow, and her dress was a full petticoat with a light body attached, and open only at the throat. She had several persons to bear her train when she walked, and her women stood behind her couch to arrange her head-dress, when, in moving, her pearls got entangled in the immense robe of scarlet and gold she had thrown around her."

नासिरउद्दीन हैदर ह्याची दिनचर्या मोठी मौजेची लिहिली आहे. हें पुस्तक कांहींसें ऐतिहासिक कादंबरीच्या धर्तीवर लिहिलें असून त्यामध्यें ह्या लखनौच्या राजविलासी व चैनी नबाबाच्या अनेक विलक्षण व गमतीच्या गोष्टी दिल्या आहेत. त्यांत त्याच्या एका युरोपियन न्हाव्याची एक गोष्ट दिली आहे, ती वाचून क्षणभर मौज वाटल्यावांचून राहत नाहीं. नासिरउद्दीन हैदर ह्यास युरोपियन तऱ्हेनें राहण्याचा फार शोक असे. तेव्हां त्यानें आपले केंस विंचरण्याकरितां व ते साफसूफ करण्याकरितां रेसिडेन्सीमध्यें नाणावलेला एक युरोपियन न्हावी* आणला. त्यानें त्यास आपल्या चातुर्यानें संतुष्ट केलें. त्यामुळें सरकारस्वारी त्यावर इतकी खुष झाली कीं, तिनें त्यास एकदम 'सर्फराजखान' ही पदवी देऊन त्यास लखनौच्या दरबारांत अग्रस्थानीं विराजित केलें. ह्या नापिकानें नासिरउद्दीन हैदर ह्यावर इतका पगडा बसविला कीं, त्याच्याशिवाय त्यास क्षणभर देखील करमेनासें झालें. ह्या न्हाव्यासंबंधानें कांहीं विरुद्ध टीकापर लेख "आग्रा आखबार" वगैरे वर्तमानपत्रांतून येत असत, म्हणून त्यानें त्यांचीं उत्तरें लिहिण्याकरितां एक शंभर रुपये पगाराचा इसम ठेविला होता. त्यानें नासिरउद्दीन ह्यास मोहून सोडून त्याजवळून २४ लक्ष रुपयांची संपत्ति मिळविली! अर्थात् अशा नीच व हलकट लोकांच्या संगतीमुळे त्याची सर्व योग्यता नाहींशी झाली व त्याच्या कुटुंबीय

* ह्या न्हाव्याचें नांव De Russett असें होतें. ह्याशिवाय आणखी चार युरोपियन लोक नबाब नासिरउद्दीन ह्याचे फार दोस्त असत. त्यांचीं नांवें व हुद्दे येणेंप्रमाणें:—१ Mauntz, हा चित्रकार व गायक होता. २ Croupley, हा ग्रंथशालाध्यक्ष होता. ३ Wright हा राजगुरु होता. Captain Magness ह्याचा हुद्दा समजत नाहीं. ह्या आंग्लपंचायतनाच्या नादानें नासिरउद्दीन दागत असे.

जनांस देखील तो अप्रिय होऊन, त्यांचें व त्याचें वैमनस्य पडलें. त्यानें प्रत्यक्ष आपला पुत्र मुन्नाजान ह्याचा गादीवरील हक्क नाहींसा करण्याचा यत्न करून त्यास राजवाड्यांतून काढवून दिलें. परंतु त्याची आजी—गाजीउद्दीन हैदर ह्याची बायको—पादशहा बेगम हिनें त्यास आपल्या ताब्यांत घेऊन त्याचें संरक्षण केलें. खुद्द राजवाड्यांत प्रत्यक्ष राजपुत्रास जेथें थारा मिळेनासा झाला, तेथें गरीब रयतेची दाद कशी लागणार, ह्याचा विचार निराळा करावयास नकोच !

नासिरउद्दीन ह्याच्या कारकीर्दींत अखेर अखेर इतकी वाईट स्थिति झाली कीं, ब्रिटिश रेसिडेंट कर्नल लो ह्यांनीं त्याची भेट घेण्याचेंही अमान्य केलें. आणि त्यांनीं गव्हरनर जनरल लॉर्ड बेंटिक ह्यांस असें लिहून कळविलें कीं, "अयोध्येच्या राज्याची इतकी निकृष्ट अवस्था झाली आहे कीं, जर राज्यकारभार आपल्या हातीं घेतला नाहीं तर त्याचा सर्वस्वीं नाश होईल." लॉर्ड बेंटिक हे शहाणे मुत्सद्दी असल्यामुळें त्यांनीं एकदम तशी गोष्ट अमलांत न आणितां, नासिरउद्दीन ह्याची समक्ष भेट घेऊन राज्यकारभार सुधारण्याबद्दल त्याची कानउघाडणी केली; व तशी सुधारणा दृष्टोत्पत्तीस आली नाहीं तर राज्यव्यवस्था ब्रिटिश सरकार आपल्या ताब्यांत घेईल असें त्यास कळविलें. परंतु त्याचा तादृश परिणाम कांहींच झाला नाहीं. शेवटीं त्यांनीं इ० स० १८३१ च्या जुलई महिन्यांत कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांस लखनौची राज्यव्यवस्था आपल्या हातीं घेण्याबद्दल परवानगी मागितली. ह्या संबंधांत बराच पत्रव्यवहार होऊन, ता० १६ जुलई इ० स० १८३४ रोजीं, त्यांचें शेवटचें उत्तर आलें. त्याप्रमाणें अयोध्येची राज्यव्यवस्था ब्रिटिश सरकारच्या हातीं जाण्याचा योग आला; परंतु सुदैवानें

त्या वेळीं अयोध्येच्या प्रधानपदावर हकीम मेहेंदी हा शहाणा माणूस असल्यामुळें त्यानें लॉर्ड बेंटिक साहेबांचें मन वळवून व राज्यांत पुष्कळ सुधारणा करून दाखवून आलेला प्रसंग टाळला. परंतु चांगल्या माणसाचें व मूर्खाचें फार दिवस सख्य राहणें शक्य नसल्यामुळें, नासिरउद्दीन ह्यानें हकीम मेहेंदी ह्यास प्रधानपदावरून दूर केलें, व आपल्या मर्जीतल्या मंडळीपैकीं रोषनउद्दौला नामक एका इसमास प्रधानगिरीचीं वस्त्रें दिलीं. त्यामुळें पुनः राज्यव्यवस्थेंत घोटाळा झाला.

हकीम महेंदी प्रधानपदावरून दूर झाल्यानंतर राज्याची पूर्ववत् अव्यवस्था होऊन ब्रिटिश सरकाराला तींत हात घालण्याचा प्रसंग येऊन ठेपला. डा० बटर ह्यांनीं इ० स० १८३७ मध्यें अयोध्येचें जें वर्णन लिहिलें आहे तें वाचलें म्हणजे झोटिंगपादशाहीची पूर्ण कल्पना करितां येते. अयोध्येचे रेसिडेंट कर्नल लो ह्यांनीं नासिरउद्दीन हैदर ह्यास पदच्युत करून दुसऱ्या योग्य माणसास गादीवर बसवावें व सर्व राज्यव्यवस्था आपल्या ताब्यांत घ्यावी असा विचार चालविला, व अयोध्येच्या प्रजेमध्येंही कंपनी सरकार राज्यव्यवस्था आपल्या हातीं घेणार, अशी दाट बातमी पसरली. परंतु तितकी स्थिति येण्यापूर्वींच ता० ७ जुलई इ० स० १८३७ रोजीं नासिरउद्दीन हैदर हा विषप्रयोग होऊन एकाएकीं मृत्यु पावला. त्यामुळें त्याच्या पदच्युतीचा प्रसंग आपोआप टळला.

नासिरउद्दीन हैदर मृत्यु पावल्यानंतर त्याच्या गादीच्या वारसाविषयीं बराच तंटा उपस्थित होऊन रक्तपातापर्यंत मजल येऊन पोहोंचली. त्याचा वृत्तांत पुढील भागीं सांगण्यांत येईल. नासिरउद्दीन ह्याचें प्रेत गोमती नदीच्या उत्तरेकडील भागामध्यें करबालानामक ठिकाणीं पुरण्यांत आलें.



**MAHOMED-ALI-SHAH.**

**महमदअलीशहा.**

(इ० स० १८३७—इ० स० १८४२).

## भाग ९ वा.

---

### महमदअल्लीशहा.

(इ० स० १८३७–इ० स० १८४२).

नासिरउद्दीन हैदर मृत्यु पावल्यानंतर लखनौ येथें मोठा राज्यक्रांतीचा प्रसंग प्राप्त झाला. नासिरउद्दीन ह्याची आई पादशहा बेगम हिला त्याचें मृत्युवृत्त समजतांच, ती नासिरउद्दीनाचा अप्रिय पुत्र मुन्नाजान ह्यास बरोबर घेऊन फरहतबक्ष राजवाड्यामध्यें आली व तिनें आपल्या तैनातींतले लोक व इतर शिपाईप्यादे ह्यांच्या साहाय्यानें त्यास सिंहासनावर बसविलें. मुन्नाजान हा नासिरउद्दीनाचा औरस पुत्र होता, परंतु नासिरउद्दीन हा विषयासक्त व मूर्ख असल्यामुळें त्यानें आपल्या दोलारी नामक वारांगनेवर मोहित होऊन तिचा मुलगा खानजहा ह्यास आपल्या पश्चात् गादी देण्याविषयीं रेसिडेंटास कळविलें होतें; व मुन्नाजान हा आपला औरस पुत्र नाहीं व त्यास गादी देऊं नये असें सांगून, त्याचा लखनौच्या गादीवरील हक्क नाहींसा केला होता. तेव्हां अर्थात्च नासिरउद्दीनाच्या मृत्यूनंतर वारसाचा प्रश्न संशयग्रस्त होऊन रेसिडेंटावर त्याचा निकाल करण्याची जबाबदारी येऊन पडावी हें साहजिक आहे. रेसिडेंट मुन्नाजान ह्याचा हक्क मंजूर करील ही खात्री नसल्यामुळें, व कांहीं अंशीं अविचारबुद्धीनें, नासिरउद्दीनाची आई पादशहा बेगम हिनें त्यास एकदम गादीवर बसविण्याची घाई केली. त्यामुळें लखनौचे रेसिडेंट कर्नल लो ह्यांस तिच्या कृतीचा प्रतिकार करणें भाग पडून त्यांनीं राजवाड्यावर सैन्य पाठविलें. बादशहा बेगम ही शूर व हिय्येबाज स्त्री

असल्यामुळें तिनें रेसिडेंटास न जुमानून त्यांच्या सैन्याबरोबर युद्ध केलें. परंतु तिचें सैन्य अगदीं थोडें असून अव्यवस्थित असल्यामुळें इंग्रज सैन्याचे अधिपति कर्नल मांटीथ ह्यांनीं तिचा पराभव केला व शेवटीं तिला व तिचा नातू मुन्नाजान ह्यांस कैद करून रेसिडेन्सीमध्यें आणिलें. पुढें त्यांनीं त्या उभयतांस चुनार येथें पाठविलें. तेथें त्यांस मरेपर्यंत २४०० रुपये दरमहा पेनशन मिळत असे. तेथेंच तीं उभयतां मृत्यु पावलीं.

नंतर रेसिडेंट कर्नल लो ह्यांनीं, नासिरउद्दीनाचा चुलता नासिरउद्दौला ह्यास गादीवर बसविण्याचा निश्चय केला, व आपण सांगाल त्याप्रमाणें तह करण्यास मी तयार आहें असें त्याजकडून लेखीं लिहून घेऊन, त्यास 'महमदअल्लीशहा' हें नांव देऊन गादीवर बसविलें. नंतर त्याजकडून ता० १८ सप्तंबर इ० स० १८३७ रोजीं नवीन तह करून घेतला. ह्यामध्यें "इ० स० १८०१ च्या तहाप्रमाणें ब्रिटिश सरकारानें अयोध्येचें संरक्षण करणें त्यांचें कर्तव्य होतें, त्याप्रमाणें त्यांनीं केलें; परंतु इ० स० १८०१ चा तह शांतपणानें झाला नसल्यामुळें त्यांत सुधारणा होणें अवश्य आहे. ह्याकरितां, पूर्वीच्या तहामध्यें अयोध्येच्या सैन्याची संख्या मर्यादित केली आहे ती मर्यादा आतां दूर करून, राज्याच्या संरक्षणाकरितां नबाबानें रेसिडेंटाच्या सल्ल्यानें आपलें सैन्य मर्जीप्रमाणें वाढवावें, व त्याच्या रिसाल्याच्या दोन पलटणी, पायदळाच्या पांच पलटणी, आणि गोलंदाजाच्या दोन पलटणी नवीन ठेवून त्यांची व्यवस्था ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं करावी व त्यांच्या खर्चाकरितां १६ लक्ष रुपये नबाबानें द्यावेत !" अशा तऱ्हेचे फेरफार केले. ह्याच तहामध्यें आणखी असें एक कलम घातलें कीं, "नबाबानें रेसिडेंटाच्या अनुमतानें राज्यकारभार चालवावा व राज्यांतील पोलीस, मुलकी व न्याय इत्यादि खात्यांची सुधारणा

करावी. परंतु ह्याप्रमाणें सुधारणा न होतां, राज्यामध्यें अंदाधुंदी, जुलूम अथवा अव्यवस्था झाली व ह्यापुढें कोणत्याही वेळीं कोणत्याही कारणानें अयोध्येच्या शांततेचा भंग झाला, तर नबाबाच्या राज्यांत हात घालण्यास व त्याची व्यवस्था करण्यास ब्रिटिश सरकारास हक्क आहे." हें कलम ह्या तहांत अंतर्भूत झाल्यामुळें ह्यानें नबाबाचें बहुतेक स्वातंत्र्य नष्ट झालें, व हाच तह अयोध्या संस्थान खालसा करण्यास लॉर्ड डलहौसी साहेबांच्या कारकीर्दींत उपयुक्त झाला, हें निराळें सांगावयास नकोच. हा तह झाल्यानंतर ह्यांतील सर्व कलमें पुढें कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांच्याकडे गेलीं. तेव्हां तीं इंग्रजी राज्यपद्धतीच्या हेतु ( Policy ) विरुद्ध असल्यामुळें तीं त्यांनीं नामंजूर करून, नबाबाचे व ब्रिटिश सरकाराचे सर्व संबंध इ० स० १८०१ च्या तहाप्रमाणें पूर्ववत् कायम ठेवावे असें ठरविलें. परंतु ही गोष्ट नबाबास कळली नाहीं !

नबाब महमदअल्लीशहा हा गादीवर बसला त्या वेळीं बराच वयोवृद्ध झाला होता व त्याचे बहुतेक दिवस एकांतवासांत गेले होते; परंतु लहानपणीं त्यास त्याचा बाप सादतअल्ली ह्याच्या कारकीर्दींत राजकीय शिक्षण बरेंच प्राप्त झाल्यामुळें तो बराच शहाणा, मितव्ययी, सभ्य आणि कर्तव्यतत्पर असा झाला होता. तो गादीवर आल्यानंतर गवयांचें व खुषमस्कऱ्यांचें साम्राज्य बंद झालें. त्यानें नासिरउद्दीनाचा प्रधान रोषनउद्दौला ह्यास प्रथमतः दूर करून राज्यांतील जुना, माहितगार व अनुभवी दिवाण हकीम मेहेंदी ह्यास प्रधानगिरीचीं वस्त्रें दिलीं. परंतु तो वार्धक्यामुळें शक्तिहीन व बुद्धिहीन झाल्यामुळें, त्याचा राज्यसुधारणेच्या कामीं विशेष उपयोग न होतां तो लवकरच मृत्यु पावला. त्याच्या मागून त्यानें झकीरउद्दौला ह्यास प्रधानगिरीचीं वस्त्रें दिलीं; परंतु तोही बिचारा लवकरच मृत्युमुखीं पडला.

तो मेल्यानंतर महमदशहानें हकीम मेहेंदी ह्याचा पुतण्या मनोवरउ-द्दौला ह्यास आपला दिवाण केलें. हा इसम मोठा प्रामाणिक व भला गृहस्थ होता; परंतु त्याचें राज्यकारभाराकडे दुर्लक्ष्य असे. त्यानें दोन वर्षांनंतर दिवाणगिरीचा राजीनामा देऊन मक्केस गमन केलें. ह्यानें लखनौ येथें हकीम मेहेंदीची मोठी कबर बांधली आहे. ह्याच्या मागून शर्फउद्दौला हा प्रधान झाला. तो महमदअल्लीशहाच्या मृत्यूपर्यंत आपल्या अधिकारावर कायम होता.

महमदअल्ली हा ऐषआरामी व विषयप्रिय असा नबाब नसल्यामुळें त्यानें आपल्या कारकीर्दींत थोडीबहुत सुधारणा केली. त्यानें सादत-अल्लीच्या वेळची 'अमानी' वसुलाची पद्धति पुनः चालू केली व संस्थानच्या खजिन्याची चांगली सुधारणा केली. तो गादीवर बसला त्या वेळीं सादतअल्लीच्या १० कोट द्रव्यापैकीं फक्त ७० लक्ष रुपये शिल्लक राहिले होते. त्यांत ह्यानें भर घालून लखनौ येथें कांहीं चांगल्या इमारती बांधल्या. त्यानें हुसेनाबाद इमामवाडा म्हणून एक सुंदर इमारत आपले स्वतःचें कबरस्थान करण्यासाठीं बांधली, व तिच्या खर्चाकरितां कंपनीस दिलेल्या कर्जाचें व्याज लावून दिलें. त्यानें ह्याच इमामवाड्या-शेजारीं एक भव्य तलाव बांधला, व दिल्लीच्या जुम्मामशिदीची बरोबरी करणारी एक नवीन जुम्मामशीद लखनौ येथें तयार करण्याचें काम चालविलें. परंतु तें संपूर्ण होण्यापूर्वींच तो मृत्यु पावला. ह्याशिवाय त्यानें सातखंडा म्हणून एक सातमजली इमारत बांधण्यास प्रारंभ करून तिचे चार मजले तयार केले होते. तात्पर्य, ह्यानें आपलें द्रव्य वाईट रीतीनें न उधळतां त्याचा चांगला विनियोग केला. ह्यानें ८० लक्ष रुपये कंपनीस व्याजीं दिले होते. ह्यास ब्रिटिश सरकाराच्या कृपेमुळें गादी प्राप्त झाली होती म्हणून त्यानें त्यांचे उपकार स्मरून त्यांस वेळोवेळीं चांगली मदत केली होती. ह्याच्या

कारकीर्दींत हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल लॉर्ड ऑक्लंड हे होते. ह्यांनीं, ता० ८ जुलई इ० स० १८३९ रोजीं, अयोध्येच्या राज्यपद्ध-तींत चांगली सुधारणा केल्यामुळें महमदअल्लीशहाचें अभिनंदन करून त्याजवर नवीन तहाप्रमाणें बसविलेला जादा लष्करी खर्च कमी कर-ण्याचें अभिवचन दिलें होतें.

महमदअल्लीशहा हा ता० १६ मे इ० स० १८४२ ह्या वर्षी मृत्यु पावला. ह्याचें शव ह्याच्या इच्छेप्रमाणें हुसेनाबाद इमामवा-ड्यामध्यें पुरण्यांत आलें. ह्यानें आपल्या मृत्युसमयीं ३९ लक्ष रोख रुपये व १,२४,००० सोन्याच्या मोहरा आपल्या खजिन्यांत शिल्लक ठेविल्या होत्या. शिवाय ह्याची कंपनीच्या खजिन्यांत शिल्लक होती ती वेगळीच. ह्याच्या मागून ह्याचा मुलगा अमजदअल्लीशहा हा गादीवर बसला.

# भाग १० वा.

## अमजदअल्लीशहा.

(इ० स० १८४२—इ० स० १८४७).

महमदअल्लीशहा मृत्यु पावल्यानंतर त्याचा दुसरा मुलगा अमजदअल्ली हा लखनौच्या गादीवर बसला. ह्यास अशगरअल्ली म्हणून एक वडील बंधु होता, परंतु तो महमदअल्लीशहा हयात असतांनाच मृत्यु पावल्यामुळें मुसलमानी धर्माप्रमाणें त्याच्या मुलाचा लखनौच्या गादीवरील हक्क नाहींसा झाला होता. अमजदअल्ली गादीवर येतांच राज्यांत पूर्ववत् अव्यवस्था सुरू झाली. अमजदअल्ली हा स्वभावानें दुष्ट किंवा दुर्बुद्धि असा नव्हता; परंतु लहानपणापासून त्यास दुस्संगति प्राप्त झाल्यामुळें त्यास शृंगारविषयाची गोडी लागली होती. त्यामुळें त्यास राज्यपद प्राप्त होतांच तो कामदेवाचा पूर्ण भक्त बनला. त्यानें राज्यसूत्रें हातीं येतांच पूर्वींचें प्रधानमंडळ बदलून त्या ठिकाणीं आपलें कुटिलमित्रमंडळ आणण्याचा प्रयत्न केला. महमदअल्लीच्या वेळचा प्रधान शरफउद्दौला नामक एक भला माणूस लखनौचा राज्यकारभार पहात होता. त्यानें नवीन यजमानाचें दुर्वृत्त पाहतांच आपल्या जागेचा राजीनामा दिला. अमजदअल्लीस ती गोष्ट पूर्ण पसंत वाटून त्यानें त्या जागेवर आपल्या मर्जींतला इमाद हुसेन नामक एक निर्बल माणूस नेमिला व त्यास अमीनउद्दौला ही पदवी दिली. परंतु चार पांच महिन्यांच्या अवधींतच त्यावर त्याची अवकृपा होऊन त्यास प्रधानगिरी सोडावी लागली. त्याच्या मागून, महमदअल्लीच्या वेळेस मक्केस गेलेला जुना प्रधान मनोवरउद्दौला हा पुनः लखनौस परत आला होता, त्यास पुनः दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. पण लखनौ येथील राजकीय कट व नवाबाची चंचलवृत्ति ह्यांमुळें



**AMJAD-ALI-SHAH.**

अमजद्अलीशहा.

(इ० स० १८४२—इ० स० १८४७.)

ही त्या जागेवर फारसा टिकला नाहीं. शेवटीं हलकट व पाजी
णसांच्या हातीं राज्यकारभार जाऊन राज्यांमध्यें अस्वस्थता उत्पन्न
ली. अर्थात् क्षणोक्षणीं जेथें दिवाणांची अदलाबदल होऊं
गली व प्याद्याचे फर्जी व फर्जीचे प्यादे होऊं लागले, तेथें सुरळीत
ज्यकारभार चालण्याची आशा करणें व्यर्थ आहे! नबाब अमजद-
ल्ली ह्याच्या दुर्वर्तनामुळें व विषयासक्ततेमुळें अयोध्येची स्थिति अति-
ाय बिघडली. ती तीन चार वर्षांच्या अवधींत इतक्या थरास
ाऊन पोहोंचली कीं, ब्रिटिश सरकारास तींत हात घालणें जरूर
ाटूं लागलें. सर हेन्री लॉरेन्स ह्यांनीं इ० स० १८४९ मध्यें
अयोध्येच्या स्थितीचें पुढें लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे :—

"प्रतिवर्षी अयोध्येची स्थिति अधिक अधिक निकृष्ट होत
चालली आहे. राज्याचा वसूल कमी कमी होत चालला आहे.
जमीनदार लोकांच्या पदरीं एका लक्षापेक्षां अधिक सैन्य आहे; व
वसूल जमा करण्यास संस्थानचें सैन्य त्यांच्या निम्में आहे! अयो-
ध्येच्या अर्ध्या अधिक भागामध्यें सभोंवतीं दाट झाडीनें वेष्टिलेले
असे बळकट किल्ले आहेत. हे पूर्वी राज्यसंरक्षणास उपयोगीं पडत
असत; परंतु सांप्रत ते प्रमत्त लोकांस स्वसंरक्षण करण्यास साधनी-
भूत झाले आहेत. आमील व संस्थानचे इतर नौकर हे दरबारास
लांच देऊन अधिकारसंपन्न झाल्यामुळें, त्यांच्या अंगीं कसली ती
योग्यता नाहीं. गरीब लोक त्यांना राज्याचा वसूल देतात, बाकीचे
त्यांस मुळींच जुमानीत नाहींत. सर्व राज्यामध्यें दिवाणी किंवा
न्यायखातें अशा नांवास शोभण्यासारखें एकही कोर्ट नाहीं.........
तात्पर्य, राज्यपद्धतीचा सर्वस्वीं नाश होऊन राज्याची अगदीं दुर्दशा
झाली आहे व ती सुधारण्याची आशा राहिली नाहीं."

वरील आशयाचें सर हेन्री लॉरेन्स ह्यांनीं अयोध्येच्या स्थितीचें

विस्तृत वर्णन केलें असून, त्यांनीं ब्रिटिश सरकारास इतकी निकृष्ट स्थिति कोणत्या मार्गानें सुधारतां येईल व प्रजेस कसें सुख देतां येईल ह्यांचेंही उत्तम प्रकारें दिग्दर्शन केलें होतें. त्यांचा लिहिण्याचा भावार्थ इतकाच होता कीं, "लखनौ दरबाराशीं कोणत्याही ठरीव पद्धतीनें ब्रिटिश सरकाराचें वर्तन होत नाहीं. दरबारांतल्या बारीक सारीक गोष्टींकडे त्यांचें लक्ष्य जातें आणि महत्त्वाच्या प्रश्नाच्या वेळीं ते स्वस्थ बसतात ही चूक आहे. नबाब, प्रधान आणि रेसिडेंट ह्या तिघांच्या हातीं सर्व सत्ता असल्यामुळें तिघांचें मतैक्य होऊन राज्यकारभार होत नाहीं. त्यामुळें एक चांगला असला तरी त्याचा उपयोग नसतो. दुसऱ्यांस त्याच्या विरुद्ध होऊन वाटेल तसा अनर्थ करितां येतो. म्हणजे पर्यायानें, प्रत्येकाच्या हातीं पुष्कळ सत्ता आहे व नाहीं असें म्हणावें लागतें. अशी स्थिति राहणें इष्ट नाहीं......... ही स्थिति सुधारण्यास लॉर्ड बेंटिक ह्यांनीं घालून दिलेल्या नियमाप्रमाणें कांहीं चांगले नियम अमलांत आणून अयोध्येचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतला पाहिजे, व होतां होईल तितकें करून सर्व व्यवस्था एतद्देशीय लोकांच्या हातीं ठेविली पाहिजे. अयोध्येच्या राज्यापैकीं कंपनीच्या खजिन्यांत एक रुपयादेखील येतां उपयोगी नाहीं. अयोध्येचा राज्यकारभार फक्त एकट्या राजाकरितां नसून, राजा व त्याचे प्रजाजन ह्यांच्याकरितां आहे असें मानून तो चालविला पाहिजे."*

सर हेन्री लॉरेन्स ह्यांनीं सुचविल्याप्रमाणें अयोध्येच्या राज्याची नीट व्यवस्था करण्याकडे लक्ष्य पुरविण्यास त्या वेळचे गव्हरनर जनरल लॉर्ड हार्डिंग ह्यांस अवकाश सांपडला नाहीं. कारण, अफगाणिस्थानांतील युद्ध, पंजाबांतील धामधूम व मध्य हिंदुस्थानांतील

* *Calcutta Review III.*

अस्वस्थता इत्यादि गोष्टी त्या वेळीं जास्त महत्त्वाच्या असल्यामुळें अयोध्येचा प्रश्न कांहीं दिवस तसाच तहकूब ठेवणें त्यांस भाग पडलें.

अमजदअल्लीशहाचे कारकीर्दींत अयोध्येचे रेसिडेंट क्याप्टन शेक्सपियर, कर्नल डेविडसन आणि कर्नल रिचमंड हे होते. ह्या तिघांनींही अमजदअल्लीस राज्यसुधारणा करण्याबद्दल पुष्कळ वेळीं विनंति केली, परंतु तिचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं अयोध्येच्या राज्यव्यवस्थेंत ब्रिटिश सरकार हात घालणार तोंच अमजदअल्ली हा आपल्या दुर्व्यसनास बळी पडून ता० १३ फेब्रुवारी इ० स० १८४७ रोजीं इहलोकांतून नष्ट झाला. ह्याची कबर हजरतगंजमधील मकाबऱ्यामध्यें आहे.

अमजदअल्ली ह्याच्या कारकीर्दींत सार्वजनिक महत्त्वाच्या गोष्टी म्हटल्या म्हणजे गोमतीनदीवरील लोखंडी पूल आणि कानपूर-लखनौ रस्ता ह्या दोनच होत. ह्यानें पंजाबच्या युद्धामध्यें ब्रिटिश सरकारास उत्तम साहाय्य केलें. त्याचप्रमाणें त्यानें लखनौच्या युरोपियन रहिवाशांच्या विनंतीवरून, त्यांच्या प्रार्थनामंदिराकरितां पुष्कळ जमीन दिली व तें बांधण्यास मदत केली. त्याचप्रमाणें त्यानें ब्रिटिश सरकारच्या परवानगीनें 'औध फ्रँटियर पोलिस फोर्स' म्हणून एक नवीन सैन्य ठेविलें. परंतु ह्या गोष्टींनीं त्याची कारकीर्द महत्त्वाची व चिरस्मरणीय न होतां, तो सदासर्वकाळ आपल्या मनोविकारांच्या स्वाधीन झाल्यामुळें ती दुराचारी व राज्यव्यवहारशून्य अशा राजांच्या मालिकेंत गोंवण्यासारखी झाली असें म्हणणें भाग आहे. मात्र ती अवधी पंचवर्षात्मकच झाली हें अयोध्येच्या प्रजेचें भाग्य समजलें पाहिजे.

---

# भाग ११ वा.

## वाजिदअल्लीशहा.

(इ० स० १८४७—इ० स० १८५६).

अमजदअल्लीशहा मृत्यु पावल्यानंतर त्याचा मुलगा वाजिदअल्ली-शहा हा गादीवर बसला. ह्याचें जन्म ता० २२ जुलई इ० स० १८२२ रोजीं झालें असून, ह्याचें वय ह्या वेळीं सुमारें २५ वर्षांचें होतें. हा लहानपणापासून जनानखान्यांतील ऐषआरामांत वाढ-ल्यामुळें ह्यास सुखोपभोगाच्या संवई लागल्या होत्या. ह्याच्या भावी कारकीर्दींचें स्वप्न अमजदअल्ली जीवंत असतांनाच दिसूं लागलें होतें. लखनौचे रेसिडेंट क्याप्टन शेक्स्पियर ह्यांनीं ता० २९ सप्तंबर इ० स० १८४९ रोजीं वाजिदअल्लीसंबंधानें असें लिहिलें होतें कीं, "सद्यःस्थितीवरून लखनौच्या राज्याचा परिणाम चांगला दिसत नाहीं. त्यांतून अमजदअल्लीस बरेंवाईट झालें तर राज्याची स्थिति फारच शोचनीय होईल. कारण, नवाबजादा वाजिदअल्ली ह्याच्या वर्तनावरून फारशी चांगली आशा करण्यास जागा नाहीं. तो स्वभावतः विषयप्रिय व चंचल वृत्तीचा असून रात्रंदिवस जना-नखान्यांत पडलेला असतो. त्यामुळें त्यास नानाप्रकारचे वाईट नाद लागून त्याचें आयुष्य व द्रव्य विषयोपभोगास अर्पण केलें आहे असें दिसतें." ह्या क्याप्टन शेक्स्पियर ह्यांच्या लेखास त्यांच्या-मागून आलेले लखनौचे दुसरे रेसिडेंट कर्नल रिचमंड ह्यांचीही साक्ष पटते. त्यांनींही आपल्या वर्ष दोन वर्षांच्या अनुभवावरून वाजिदअल्लीशहा ह्याबद्दल असें लिहिलें होतें कीं, "क्याप्टन शेक्स्पियर ह्यांनीं वर्णन केल्याप्रमाणें त्याची स्थिति असून, दुर्व्य-सनें, हलकट लोकांची संगति, अनपेक्षित अधिकारप्राप्ति आणि



**WAJID-ALI-SHAH.**

**वाजिद्अलीशाहा.**

(इ० स० १८४७—इ० स० १८५६).

अल्प शिक्षण ह्यांमुळें त्यास आपण ऐहिक सुखाच्या शिखरावर जाऊन पोहोंचलों असें वाटूं लागावें; आणि राजाची इच्छा हीच सर्वांत बलवत्तर असें मानून, त्यानें आपल्या मर्जींतल्या लोकांवर, प्रजेच्या नुकसानीकडे दृष्टि न देतां, वाटेल ती मेहेरबानी करण्यांत गुंग व्हावें ह्यांत आश्चर्य नाहीं." ह्या दोन रेसिडेंटांच्या ह्या अल्प-वर्णनावरून वाजिदअल्लीशहा ह्याच्या भावी कारकीर्दीची वाचकांस सहज कल्पना करितां येईल.

हिंदुस्थानामध्यें आजपर्यंत जे दुर्व्यसनी, दुर्वृत्त, विषयासक्त आणि कर्तव्यशून्य असे राजे निर्माण झाले, त्यांतील प्रमुखांमध्यें वाजिद-अल्लीची गणना करण्यास हरकत नाहीं. महाराष्ट्रराज्यसत्तेचा विनाश करण्यास ज्याप्रमाणें दुसरे बाजीराव पेशवे अवतीर्ण झाले, त्याप्रमाणें लखनौच्या राज्यवैभवाची राखरांगोळी करण्यास नबाब वाजिदअल्लीशहा हा अवतीर्ण झाला, असें म्हटलें असतां त्यांत अति-शयोक्ति होणार नाहीं. दुसरे बाजीराव पेशवे व नबाब वाजिदअ-ल्लीशहा ह्यांच्या चरित्रांत अतिशय साम्य आहे. त्यांनीं ज्याप्रमाणें त्रिंबकजी डेंगळ्यासारख्या नीच व विषयासक्त पुरुषास दिवाण-गिरीच्या कामावर नेमिलें, त्याप्रमाणें वाजिदअल्लीशहा ह्यानेंही अल्ली-नकीखान नामक एका नीच मनुष्यास लखनौच्या दिवाणगिरीवर नेमिलें. बाजीराव पेशवे व त्यांचे दिवाण ह्यांनीं ज्याप्रमाणें मदन-लीला, स्वेच्छाचार आणि चैनबाजी ह्यांकडे लक्ष्य पुरवून राज्यकारभा-राची अव्यवस्था केली, त्याप्रमाणें वाजिदअल्लीशहा व त्याचा दिवाण अल्लीनकीखान ह्यांनींही वर्तन करून लखनौच्या राज्याची दुर्दशा केली.

वाजिदअल्लीशहा गादीवर बसल्यानंतर इ० स० १८४७ च्या नोव्हें-बर महिन्यांत हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल लार्ड हार्डिंग ह्यांनीं लखनौस जाऊन त्याची भेट घेतली, व त्यास आपला राज्यकारभार रेसिडेंटाचे

अनुमतानें चालवून दोन वर्षांत अयोध्येच्या राज्याची सुधारणा केली पाहिजे अशी ताकीद केली. त्याप्रमाणें त्यानें कांहीं महिने दरबारी लोक जमवून बाह्यात्कारें गव्हरनर जनरलच्या म्हणण्याप्रमाणें आपण राज्यव्यवस्था चालवीत आहोंत असा देखावा केला; परंतु त्याचें अंतरंग सर्वस्वीं विषयरंगानें रंगून गेल्यामुळें त्यास रंगमहालांतील लीलांवांचून अन्यत्र गोडी वाटेनाशी झाली. सुंदर व मनमोहक स्त्रिया, गानवादनपटु व विनोदकुशल गवई, हरहुन्नरी व हजरजबाबी खुषमस्करे इत्यादि लोकांवांचून त्यास दुसरें कांहीं प्रिय वाटेनासें झालें. रेसिडेंट व राज्यांतील भले लोक ह्यांनीं त्यास ताळ्यावर आणण्याकरितां पुष्कळ वेळां उपदेश केला व नानातऱ्हेचे प्रयत्न केले; परंतु ते सर्व निष्फळ होऊन तो सर्वस्वीं हलकट व पाजी लोकांच्या ताब्यांत गेला. लखनौचे रेसिडेंट कर्नल रिचमंड ह्यांची बदली होऊन त्यांच्या जागीं इ० स० १८४९ सालीं कर्नल स्लीमन नामक एक चांगले अनुभवी रेसिडेंट तेथें गेले. त्यांनीं लखनौच्या शहाण्या व सभ्य लोकांचें एक कौन्सिल नेमून, त्यांच्या मार्फत राज्यसुधारणा करण्याचा पुष्कळ यत्न केला. परंतु खुद्द नबाब आपल्या हलकट व नीच मित्रमंडळांतून बाहेर निघेना, त्यामुळें त्यांचा निरुपाय होऊन त्यांनाही हात टेंकणें भाग पडलें ! नबाबाची इतकी शोचनीय स्थिति झाली कीं, तो रझीउद्दौला नामक एका गवयाच्या पूर्णपणें ताब्यांत जाऊन त्याच्या शिवाय कोणासही भेटेनासा झाला ! ! लखनौचे बडे लोक, सरदारलोक, खुद्द राजघराण्यांतले लोक ह्यांची व त्याची मुळींच भेट होईनाशी झाली ! ! तात्पर्य, व्यसनार्तता व दुर्जनसंगति ह्यांच्या योगानें मनुष्यावर जितके वाईट परिणाम होणें शक्य आहे तितके वाजिदअल्लीशहावर होऊन, तो नीचतम व निंद्य अशा स्थितीप्रत जाऊन पोहोंचला.

वाजिदअल्लीशहा ह्याचें सर्व प्रकारें राज्यकारभाराकडे दुर्लक्ष्य झाल्यामुळें सर्व अयोध्याप्रांतामध्यें अंदाधुंदी माजली. प्रांतोप्रांतींचे अधिकारी स्वेच्छाचारी होऊन प्रजेवर जुलूम करूं लागले. गांवोगांवीं लूटमाऱ्या ह्यांची गर्दी होऊन लोकांच्या जीविताची व वित्ताची शाश्वती राहिली नाहीं. 'नाझिम' म्हणून प्रत्येक जिल्ह्याचे जे वरिष्ठ अधिकारी होते ते आपापल्या ठिकाणीं स्वतंत्र होऊन वाटेल त्या प्रकारानें आपला अंमल चालवूं लागले. लखनौ दरबारचा त्यांच्यावर कांहींच धाक न राहिल्यामुळें गरीब रयतेस दाद मागण्यास कोठेंच साधन राहिलें नाहीं. त्यामुळें गरीब लोकांच्या व रयतेच्या तक्रारी रेसिडेंटाकडे येऊं लागल्या. तेव्हां रेसिडेंट कर्नल स्लीमन ह्यांनीं सर्व अयोध्याप्रांतामध्यें हिंडून वास्तविक स्थिति कोणत्या प्रकारची आहे ती पाहण्याचा विचार केला. त्याप्रमाणें त्यांनीं, ता० १ डिसेंबर इ० स० १८४९ पासून ता० २८ फेब्रुवारी इ० स० १८५० पर्यंत सुमारें तीन महिने सर्व अयोध्या प्रांतांत प्रवास केला, व जागोजागची खरी स्थिति निरीक्षण केली. त्यांनीं समक्ष पाहिलेल्या सर्व गोष्टींचें वर्णन उत्तम प्रकारें लिहिलें असून, तें " अयोध्येंतील प्रवास " ( Journey through Oude ) ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्यांत अयोध्येच्या बेबंदशाहीचें चित्र अगदीं हुबेहूब काढिलें असून त्याची योग्यता कांहीं अंशीं आर्थर यंगच्या "फ्रान्स देशांतील प्रवास" ( Travels in France ) नामक पुस्तकासारखी आहे. कारण, तें लिहिल्यानंतर ज्याप्रमाणें फ्रान्सदेशामध्यें राज्यक्रांति झाली, त्याप्रमाणें ह्याही प्रवासानें अयोध्येमध्यें राज्यक्रांति झाली. असो. कर्नल स्लीमन ह्यांनीं इ० स० १८५० मध्यें अयोध्येच्या राज्यस्थितीचें आपल्या नेत्रांनीं अवलोकन करून गव्हरनर जनरल ह्यांच्याकडे ती सर्व हकीकत लिहून पाठविली. परंतु गव्हरनर-जनरल

ह्यांचें लक्ष्य ह्या वेळीं ब्रह्मदेशांतील लढाईत गुंतल्यामुळें, त्यांनीं तिचा विचार करण्याचें काम जरा लांबणीवर टाकिलें. परंतु अयोध्येची स्थिति दिवसेंदिवस अत्यंत निकृष्ट होत चालली. तेव्हां कर्नल स्लीमन ह्यांनीं इ० स० १८५२ च्या सप्टेंबर महिन्यामध्यें, गव्हरनर जनरल लॉर्ड डलहौसी ह्यांस असें लिहिलें कीं, "नबाब वाजिदअल्ली हा जितके दिवस अधिक राज्य करील तितका तो राज्य करण्यास अधिक अपात्र होईल व तितका देशाचा व लोकांचा अधिक नाश होईल. ह्यापूर्वींच संस्थानचें दिवाळें निघालें असतें, परंतु आज तीन वर्षें नबाब व त्याचें कुटिल मंत्रिमंडळ ह्यांनीं अमजदअल्लीच्या कुटुंबावांचून राजघराण्यांतील इतर सर्व लोकांच्या नेमणुका बंद केल्या आहेत. ह्यांपैकीं बहुतेक लोकांची अत्यंत दीन स्थिति होऊन त्यांना ब्रिटिश सरकारानें मध्यस्ती केल्यावांचून नेमणुका मिळण्याची आशा राहिली नाहीं. पूर्वीच्या नबाबांच्या स्त्रियांनीं आपल्या निर्वाहाकरितां कांहीं मिळावें म्हणून फार ओरड केली; परंतु तिचा उपयोग न होतां त्यांना निर्दय व निर्लज्जपणानें, रस्तोरस्तीं भिक्षा मागण्याकरितां किंवा काबाडकष्ट करण्याकरितां, राजवाड्यांतून हांकून लाविलें आहे. खुद्द नबाबास गाणारे, बजावणारे, हलकट लोक आणि त्यांच्यापेक्षां नीच असे कुकवि ह्यांनीं वेढून टाकिलें आहे. दिवाण व त्याचें हस्तक हे तर त्यांपेक्षांही वाईट आहेत. ते राज्याचा अर्धा वसूल आपल्या घशांत टाकितात व राज्यांतील सर्व खात्यामध्यें पाजी अशा षंढ लोकांची नेमणूक करितात. तंतुवाद्यकार दिवाणीखात्याचे अधिकारी झाले आहेत, षंढ लोक फौजदारी खात्याचे अंमलदार

बनले आहेत, आणि खुद्द दिवाणसाहेब वसुलाचें काम पहात आहेत ! ह्याप्रमाणें सर्वजण आपलें उखळ पांढरें करीत आहेत !"* ह्याप्रमाणें ज्या राज्यांत मूर्खपणाचा बाजार सुरू झाला, तेथें दुर्धर परिणाम घडून यावेत ह्यांत आश्चर्य तें काय ?

कर्नेल स्लीमन ह्यांनीं नबाब वाजिदअल्लीशहा ह्याच्या मूर्खपणाच्या व अविचाराच्या अशा कांहीं चमत्कारिक गोष्टी लिहिल्या आहेत कीं, त्या वाचून मनास एक प्रकारचा तिरस्कार व किळस वाटूं लागते. त्याची व्यसनार्तता व विषयासक्ति इतकी विलक्षण होती कीं, तिचें वर्णन करणें म्हणजे पवित्र लेखणीस विटाळण्यासारखें आहे. त्याची लहरी व उच्छृंखल मनोवृत्ति पुढें पुढें इतकी बेताल झाली होती कीं, त्याला आपण सिंहासनाधीश्वर आहोंत ह्याचें मुळींच भान नाहींसें झालें. तो नानाप्रकारचे वेडे वेडेचार करूं लागला. आणि शेवटीं, मोहरमामध्यें असभ्य सोंगें घेऊन व गळ्यांत तबला अडकवून भररस्त्यानें नाचूं बागडूं लागला. अशा अधम नबाबाची अपवित्र संगति राज्यलक्ष्मीस व विद्वान् लोकांस अप्रिय व्हावी ह्यांत आश्चर्य तें काय ? भोजप्रबंधामध्यें म्हटलें आहे:—

* Sleeman's Oude, Vol. II. Page 369. कर्नेल स्लीमन ह्यांनीं दिवाण अल्लीनकीखान ह्या संबधानें आणखी एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,—

"He appears to me to be the most deeply interested of all in maintaining the worst abuses of the present system of administration, and I consider it painful and humiliating to be obliged, by my public duties, to hold, any longer, communication with such a person on the subject of the many evils which he could, but will not, remedy; of the many wrongs which he could, but will not redress; and of the many fearful sufferings which he could, but will not, relieve."

पातकानां समस्तानां द्वे परे पातके मते ॥
एकं दुःसचिवो राजा द्वितीयं च तदाश्रयः ॥ १ ॥

"सर्व पातकांत दोन पातकें मोठीं मानलीं आहेत; एक, दुष्ट प्रधान जवळ बाळगणारा राजा; आणि दुसरें, असल्या राजाचा आश्रय." तेव्हां अशा पापापासून सज्जनांनीं दूर व्हावें हें साहजिकच आहे. असो.

नबाब वाजिदअल्ली हा दुर्व्यसनांत अगदीं निमग्न झाला व त्याचें वर्तन सुधारण्याची आशा बिलकूल राहिली नाहीं; असें पाहून कर्नल स्लीमन ह्यांनीं, ब्रिटिश सरकारानें सार्वभौमत्वाच्या नात्यानें अयोध्येचा राज्यकारभार आपल्या हातीं घ्यावा, आणि तो नबाबाच्या नांवानें आपण चालवावा, अशी गव्हरनर जनरल ह्यांस शिफारस केली. कर्नल स्लीमन ह्यांचा हेतु अयोध्येचें राज्य खालसा करावें असा बिलकूल नसून, फक्त तेथें माजलेली झोटींगपादशाही बंद करावी व तेथील राज्यव्यवस्था प्रजेस सुखावह होईल अशी करावी, असा होता. त्यांनीं गव्हरनर जनरल लॉर्ड डलहौसी ह्यांस अयोध्येसारखें एतद्देशीय प्रचंड संस्थान नष्ट करणें ब्रिटिश सरकारास हितावह नसून तसें केलें असतां आपल्या कीर्तीस कलंक लागेल असें स्पष्ट कळविलें होतें.* परंतु लॉर्ड डलहौसी ह्यांचा कल एतद्देशीय संस्थानें खालसा करण्याकडे विशेष असल्यामुळें त्यांनीं अयोध्येच्या बेबंदशाहीचा फायदा घेऊन, तें पूर्णपणें ब्रिटिश राज्यांत सामील करण्याचा विचार मनांत आणिला.

---

*कर्नल स्लीमन ह्यांच्या विरुद्ध रिपोर्टामुळें अयोध्या संस्थान खालसा झालें असें किल्येकांचें मत आहे. परंतु कर्नल स्लीमन ह्यांचें स्वतःचें मत त्याच्या अगदीं विरुद्ध होतें असें त्यांच्या अनेक पत्रांवरून व्यक्त होतें. त्यांनीं आपलें

कर्नल स्लीमन ह्यांस अयोध्या संस्थान नबाबाकडे कायम ठेवून त्याच्या राज्यकारभाराची कांहींतरी चांगली व्यवस्था लावावी अशी फार इच्छा होती. त्याप्रमाणें त्यांनीं गव्हरनर जनरल ह्यांशीं पुष्कळ पत्रव्यवहार करून आपलीं साधक बाधक कारणें त्यांस सादर केलीं होतीं. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें ह्या गोष्टीचा विचार होणार तोंच त्यांची प्रकृति नादुरुस्त झाली. त्यामुळें त्यांनीं रजा घेतली व त्यांच्या जागीं जनरल औट्राम ह्यांची नेमणूक झाली.

---

मत किती जोरदार व स्पष्ट शब्दांनीं नमूद केलें आहे, हें पुढील उताऱ्यावरून वाचकांच्या लक्ष्यात येईल:—

"Were we to take advantage of the occasion to annex or confiscate Oudh, or any part of it, our good name in India would inevitably suffer; and that good name is more valuable to us than a dozen of Oudhs. We are now looked up to throughout India as the only impartial arbitrators that the people generally have ever had.........and from the time we cease to be so looked up to, we must begin to sink. We suffered from our conduct in Sindh; but that was a country distant and little known, and linked to the rest of India by few ties of sympathy. Our conduct towards it was preceded by wars and convulsions around, and in its annexation there was nothing manifestly deliberate. It will be otherwise with Oudh. Here the giant's strength is manifest, and we cannot 'use it like a giant' without suffering in the estimation of all India. Annexation or confiscation are not compatible with our relations with this little dependent State. We must show ourselves to be highminded, and above taking advantage of its prostrate weakness, by appropriating its revenues exclusively to the benefit of the people and royal family of Oudh. We should soon make it the finest garden of India, with the people happy, prosperous, and attached to our rule."

जनरल औट्राम हे लखनौस येण्यास निघाले त्या वेळीं गव्हरनर जनरल लॉर्ड डलहौसी ह्यांनीं त्यांस ता० २१ नोव्हेंबर इ० स० १८५४ रोजीं एक खलिता पाठविला; आणि त्यांत कर्नल स्लीमन ह्यांनीं वर्णन केलेली स्थिति अयोध्येंत अद्यापि चालू आहे किंवा त्यांत कांहीं फरक झाला आहे,ह्याची माहिती विचारली. त्याप्रमाणें जनरल औट्राम ह्यांनीं ता० १५ मार्च इ० स० १८५५ रोजीं अयोध्येच्या राज्यस्थितीवर एक प्रचंड रिपोर्ट पाठविला. त्यांत, मुख्यत्वेंकरून, १ नबाब व त्याचा दिवाण, २ वसूल व खजिना, ३ न्यायखातें व पोलीस खातें, ४ सैन्य, ५ रस्ते व सार्वजनिक कामें, ६ गुन्ह्यांची वर्गवारी, ७ जुलूम व अन्याय, अशा सात सदरांखालीं अयोध्येची सर्व माहिती दिली. त्यांतील कांहीं कांही गोष्टी वाचनीय आहेत. अयोध्येचे दिवाण अल्लीनकीखान ह्यांचा पगार वर्षाचा १,१४,००० रुपये असून त्यांना इतर देणग्या वगैरे ७ लक्ष रुपयांच्या मिळत होत्या. इ० स० १८५३ व ५४ सालचा एकंदर वसूल १,२०,००,००० रुपये जमा झाला होता; परंतु त्यांपैकीं ३० किंवा ४० लक्ष लखनौस आले, बाकी सर्व प्रांतोप्रांतींच्या अधिकाऱ्यांनीं आपल्या तोंडांत टाकले! अयोध्याप्रांतांतील एकंदर न्यायखात्याचा खर्च अवघा १६,००० रुपये होता! अयोध्येच्या एकंदर सैन्याची संख्या ६०,००० होती, व त्यांचा वार्षिक खर्च ४२ लक्ष रुपये होता! सार्वजनिक रस्ता फक्त लखनौ-कानपूर हा असून इतर सार्वजनिक इमारतीकरितां मोठमोठ्या रकमा खर्ची पडल्या होत्या! जुलूम व अन्याय ह्यांची तर सीमाच नव्हती! राज्यांतील दिवाणसाहेबापासून तों कनिष्ठ प्रतीच्या नौकरापर्यंत सर्व लांचखाऊ व अप्रामाणिक लोक होते!! तात्पर्य, ह्या रिपोर्टामध्यें कर्नल स्लीमनसाहेबांनीं वर्णन केलेली सर्व स्थिति स्पष्ट रीतीनें पुनः मांडली होती.

वरील रिपोर्ट तयार होऊन गव्हरनर जनरल ह्यांच्याकडे कलकत्त्यास रवाना झाला, त्या वेळीं लॉर्ड डलहौसी तेथें नसून उटकमंड येथें गेले होते. तेव्हां कलकत्ता कौन्सिलचे सभासद व लखनौचे माजी रेसिडेंट जनरल लो ह्यांनीं तो आपल्या अभिप्रायानिशीं लॉर्ड डलहौसी ह्यांच्याकडे पाठविला त्यांच्या अभिप्रायाचा सारांश अयोध्येच्या संस्थानांत आपण हात घालण्यास विलंब करूं नये असाच होता. लॉर्ड डलहौसी ह्यांनीं हा रिपोर्ट आल्यानंतर त्याबद्दल विचार करून ता० १८ जून इ० स० १८५५ रोजीं आपला जंगी ठराव तयार केला. त्यांत त्यांनीं वॉरन् हेस्टिंग्ज ह्यांच्या कारकीर्दीपासून अयोध्येच्या राज्याशीं ब्रिटिश सरकाराचा जो संबंध जडला त्याचें सिंहावलोकन करून, त्यावर आपला सार्वभौमत्वाचा हक्क १८०१ च्या तहाप्रमाणें कसा चालवितां येतो ह्याबद्दल विवेचन केलें. इ० स० १८३७ चा नासिरउद्दीनाच्या वेळचा तह कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांनीं नामंजूर केल्यामुळें इ० स० १८०१ च्या तहाखेरीज ह्या संस्थानांत हात घालण्यास दुसरा मार्ग नव्हता. परंतु ह्या तहांतही ब्रिटिश सरकारानें अयोध्येच्या राज्यकारभारांत प्रत्यक्ष हात घालावा असा स्पष्ट उल्लेख नव्हता; म्हणून त्यांनीं अनेक कारणें लावून, अयोध्येच्या प्रजेच्या कल्याणाकरितां, तो प्रांत ब्रिटिश अमलांत घेणें भाग आहे असें ठरवून, शेवटीं पुढील चार मार्ग त्यांनीं शोधून काढिले.

" १. नबाबानें आपल्या राज्याधिकाराचा दुरुपयोग केला ह्याकरितां त्याजकडून तो काढून घ्यावा; व अयोध्याप्रांत ब्रिटिश मुलखांत सामील करण्याबद्दल त्याची संमति मिळवावी.

" २. नबाबाचा राजकीय हुद्दा व दर्जा त्याजकडे कायम ठेवावा, परंतु

त्याजकडून अयोध्येच्या राज्यावरील सर्व दिवाणी व लष्करी अधिकार ईस्ट इंडिया कंपनीकडे कायमचे द्यावेत.

"३. नबाबास आपलें राज्य कांहीं दिवसपर्यंत ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या हातीं सोंपवून देण्याबद्दल विनंति करावी.

"४. नबाबानें आपली राज्यव्यवस्था रेसिडेंटाच्या हातीं द्यावी व नबाबाच्या लोकांनीं ब्रिटिश अधिकाऱ्याच्या मदतीनें ती चालवावी."

ह्या चार मार्गांपैकीं त्यास पहिला सर्वांत उत्तम वाटला. परंतु अयोध्येच्या नबाबांनीं ब्रिटिश सरकाराशीं इमानें इतबारें वर्तन केलें असून संकटप्रसंगीं त्यांस चांगलें साहाय्य केलें होतें, तेव्हां एकदम त्यांचें राज्य सर्वस्वीं खालसा करणें त्यांना पसंत वाटलें नाहीं. तेव्हां त्यांनीं तो मार्ग रहित केला. चवथा मार्ग लॉर्ड वेलस्ली ह्यांनीं इ० स० १७९९ मध्यें लिहून ठेवलेल्या माहितीप्रमाणें समाधानकारक नव्हता, व तिसरा मार्ग हैदराबाद व नागपूर येथें अमलांत आणून पाहिल्यामुळें तो स्वानुभवानें निरुपयोगी ठरला होता. तेव्हां लॉर्ड डलहौसी ह्यांनीं दुसरा मार्ग—म्हणजे नबाबाकडे राजकीय हुद्दा वगैरे कायम ठेवून सर्व राज्य कायमचें आपल्या हातीं घेणें हा—पसंत करून त्याचें अवलंबन करण्याचें ठरविलें. त्याकरितां त्यांनीं प्रथमतः नबाबास "इ० स० १८०१ च्या तहाच्या मर्यादेचा भंग झाला व अयोध्येच्या राज्याची बिलकूल व्यवस्था राहिली नाहीं, ह्याकरितां तुम्हीं नवीन तह करावा; नाहींतर ब्रिटिश रेसिडेंट इंग्रजसैन्यासह तेथून निघून जाईल;" अशी सूचना करावी असें योजिलें. लॉर्ड डलहौसी ह्यांचा ठराव विस्तृत असून त्यांत राजनीतीच्या कुटिल स्वभावाचें बरेंच प्रदर्शन होतें. हा सर्व ठराव वाचनीय आहे, परंतु तो फार विस्तृत असल्यामुळें स्थलसंकोचास्तव येथें देतां येत नाहीं.

गव्हरनर जनरल ह्यांचा ठराव त्यांचे कौन्सिलचे सभासद मि०

डोरिन, कर्नल जॉन लो, मि० बार्नेस पीकॉक, आणि मि० जॉन पीटर ग्र्यांट ह्यांच्याकडे गेला. त्यांचें सर्वांचें त्यांस थोड्याबहुत अंतरानें अनुकूल मत पडलें. नंतर हें सर्व प्रकरण कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांच्याकडे गेलें. त्यांनींही लॉर्ड डलहौसी ह्यांच्या ठरावास आपली संमति देऊन लखनौच्या राजघराण्यांतील लोकांस भरपूर पेनशन द्यावें अशी सूचना केली. अर्थात् लॉर्ड डलहौसी ह्यांचा ठराव मंजूर होऊन आल्यानंतर, ता० २३ जानेवारी इ० स० १८५६ रोजीं, त्यांनीं व त्यांच्या सभासदांनीं, लखनौच्या रेसिडेंटानें त्यांचीं अंमलबजावणी कशी करावी, ह्याबद्दल एक सूचनापत्र तयार केलें. त्यांत, अयोध्येचें सैन्य कानपुरास न्यावें व जरूरीपुरतें सैन्य कर्नल व्हीलर ह्यांच्या हाताखालीं देऊन रेसिडेंटानें तें लखनौस ठेवावें; तेथें जर विरुद्ध प्रकार कांहीं दिसला तर रेसिडेंटानें अयोध्येच्या सर्व सैन्याचें आधिपत्य आपल्याकडे घ्यावें. नबाब वाजिद्अल्लीशहा ह्यास पदच्युत करण्याचा हुकूम त्याचा प्रधान अल्लीनकीखान ह्याचे मार्फत त्यांचे कानावर घालावा. नंतर रेसिडेंटानें नबाबाची समक्ष भेट घ्यावी, आणि त्यास असें कळवावें कीं, 'इ० स० १८०१ सालीं जो तह झाला होता त्याप्रमाणें अयोध्येच्या नबाबांचें वर्तन झालें नाहीं, ह्याकरितां ब्रिटिश सरकारास तो तह रद्द करून नबाबाशीं दुसरा तह करणें अथवा अयोध्येच्या राज्याचा अधिकार काढून घेणें भाग वाटत आहे.' ह्यानंतर नबाबास लॉर्ड डलहौसी साहेबांचा खलिता सादर करावा. ह्या खलित्यामध्यें अयोध्येच्या नबाबाचा व ब्रिटिश सरकारच्या संबंध कोणत्या प्रकारचा आहे ह्याची हकीकत देऊन, नबाबाच्या राज्यव्यवस्थेचा अत्यंत निषेध केला होता; व असली बेबंदशाही चालू ठेवणें व लक्षावधि लोकांचा छळ ब्रिटिश सरकारच्या नजरेसमोर चालूं देणें हें ईश्वराच्या घरीं मोठें पातक आहे; ह्या-

करितां पूर्वीचा तह रद्द करून रेसिडेंटाच्या म्हणण्याप्रमाणें नवीन तह मान्य करावा, अशी नबाबाची समजूत घातली होती. हें पत्र दिल्यानंतर रेसिडेंट ह्यानें आपला नवीन तहाचा खलिता त्यास सादर करावा व तो पसंत करण्यास तीन दिवसांची मुदत द्यावी. त्याप्रमाणें त्यानें मान्य केलें तर ठीकच आहे; नाहींतर अयोध्येचें राज्य गव्हरनर जनरलचे जाहिरनामे प्रसिद्ध करून ताब्यांत घ्यावें, असें कळविलें होतें. ह्याप्रमाणें रेसिडेंट जनरल औट्राम ह्यांस सूचनापत्रक पोहोंचल्यानंतर त्यांनीं त्याप्रमाणें सर्व बंदाबस्त करून तें अमलांत आणण्याची तजवीज केली.

त्यांनीं प्रथमतः दिवाण अल्लीनकीखान ह्याची तीन दिवस अगोदर भेट घेऊन त्याच्या मार्फत राजवाड्यांत नबाबास भेटण्याची वेळ नेमिली. त्याप्रमाणें ते ता० ४ फेब्रुवारी इ० स० १८५६ रोजीं क्याप्टन हेज व वेस्टन ह्यांच्यासहवर्तमान राजवाड्यांत गेले. तेथील सर्व लोकांचीं शस्त्रें वगैरे अगोदरच काढून घेतलीं होतीं, त्यामुळें एकही मनुष्य तेथें सशस्त्र राहिला नव्हता. नबाब वाजिदअल्ली हा रेसिडेंटांस सामोरा आला व त्यानें त्यांचा सत्कार करून त्यांस नेहमींच्या दरबारांत योग्य स्थानीं बसविलें. ह्या भेटीच्या वेळीं दिवाण अल्लीनकीखान हा हजर असून नबाबाचा भाऊ शिकंदर हशमतअल्ली, रेसिडेन्सी वकील मशीरउद्दौला व त्याचा नायब साहेबउद्दौला आणि संस्थानचे फडणीस राजा बालकिशन इतकी मंडळी हजर होती. नंतर जनरल औट्राम ह्यांनीं नबाबाची भेट घेण्याचें प्रयोजन कळवून त्यास गव्हरनर, जनरल ह्यांचा अस्सल खलिता सादर केला. नबाबानें तो लक्ष्यपूर्वक वाचला, आणि कांहीं वेळानें 'मजवर असा प्रसंग कां आला?' 'मीं काय अन्याय केला आहे!' असे उद्गार काढिले. रेसिडेंटांनीं त्यास योग्य उत्तर देऊन त्याच्या

अव्यवस्थित कारकीर्दीचें हें फळ आहे असें नीट समजून सांगितलें व त्यास नवीन तहाचा मसुदा सादर केला. हा मसुदा पाहिल्याबरोबर नबाबास अत्यंत गहिंवर आला व त्यानें साहेबउद्दौला ह्यास तो मोठ्यानें वाचण्याबद्दल विनंति केली. साहेबउद्दौला ह्यास तीं कलमें पाहून अत्यंत विस्मय वाटला व त्याचा कंठ भरून येऊन त्याच्यानें तो वाचवेना. तेव्हां खुद्द नबाबानेंच तो आपल्या हातीं घेऊन प्रत्येक कलम वाचून पाहिलें. ह्या मसुद्यामध्यें पुढील कलमें होतीं.

१. अयोध्येच्या राज्यावरील सर्व हक्क नबाबानें कायमचे ईस्ट इंडिया कंपनीच्या स्वाधीन करावेत व कंपनीनें नबाबाचा इतमाम राखून त्यास योग्य तैनात द्यावी.

२. नबाबाचा 'अयोध्येचा बादशहा' ( King of Oudh ) हा किताब नबाबाकडे व त्याच्या औरस संततीकडे सदैव चालवावा.

३. नबाब व त्यांचे वंशज ह्यांचा ब्रिटिश सरकारानें सर्व प्रसंगीं सार्वभौम नृपति ह्या नात्याप्रमाणें इतमाम व मानमरातब राखावा.

४. लखनौच्या राजवाड्यांतलें व दिल्खुष आणि बिबियापुर ह्या दोन ठिकाणांचें सर्व स्वामित्व नबाबाकडे ठेवून त्यास तेथील देहांतशिक्षेवांचून इतर सर्व हक्क द्यावे.

५. नबाब वाजिदअल्लीशहा ह्यास त्याच्या खर्चाकरितां व शानशौकतीकरितां कंपनी सरकाराकडून अयोध्येच्या वसुलापैकीं दरसाल १२ लक्ष रुपये मिळत जातील व त्याच्या राजवाड्यांतील हुजूर सैन्याच्या खर्चाकरितां आणखी तीन लक्ष रुपये देण्यांत येतील. त्याचप्रमाणें नबाबाच्या पश्चात् त्याच्या प्रत्येक वारसास कंपनी सरकाराकडून १२ लक्ष रुपये सालिना मिळत जातील.

६. नबाबाच्या राजघराण्यांतील सर्व नातेवाइकांस नबाबाच्या इच्छेप्रमाणें कंपनी सरकाराकडून पेनशन मिळत जाईल.

ह्याप्रमाणें नबाब वाजिदअल्लीशहा ह्यास नवीन तहाचा मसुदा जनरल औट्राम ह्यांनीं सादर केला, व तो मान्य करून त्यावर सही देण्याबद्दल नबाबास तीन दिवसांची मुदत दिली. हीं कलमें वाचतांच त्यास दुःखाचा अनावर वेग उत्पन्न झाला. त्यानें मुसलमानी पद्धतीस अनुसरून, ब्रिटिश सरकाराचा थोरपणा व वैभव ह्यांचें गुणानुवादन करून आपला नम्रपणा व्यक्त केला, व ह्या तहावर सही करण्यास आपली योग्यता नाहीं वगैरे सर्व औपचारिक शब्दलाघव दाखविलें. रेसिडेंटानें, तह मान्य केला नाहीं तर भयंकर परिणाम ओढवतील, व शेवट चांगला होणार नाहीं, वगैरे सर्व गोष्टी स्पष्ट शब्दांनीं त्यास समजून सांगितल्या. तेव्हां नबाबाच्या नेत्रांस अश्रु येऊन त्यानें, ब्रिटिश सरकारानें आपल्या पूर्वजांवर केलेल्या उपकारांचें स्मरण केलें व स्वतःची करुणास्पद स्थिति त्यांस निवेदन केली. एवढेंच नव्हे, तर त्यानें आपल्या डोकीचा मंदील काढून तो रेसिडेंटाच्या हातीं दिला, आणि त्याच्या हातींपायीं पडून त्यानें तह अमलांत आणूं नये म्हणून त्याची विनवणी केली. रेसिडेंटानें ह्या तहाच्या अटी मान्य केल्यावांचून दुसरा कोणताही विचार होणार नाहीं असें स्पष्ट सांगून त्यास तीन दिवसांची मुदत दिली, व नबाबाचा निरोप घेतला.

नबाब वाजिदअल्लीशहा ह्यानें दुर्मंत्र्याच्या नादानें तहाच्या अटी मान्य करण्याचें नाकबूल करून तिसरे दिवशीं त्याप्रमाणें रेसिडेंटास जबाब पाठविला. तो मिळतांच जनरल औट्राम ह्यांनीं अयोध्येचें राज्य खालसा केल्याबद्दल जाहिरनामे प्रसिद्ध करून ता० ७ फेब्रुवारी इ० स० १८५६ रोजीं नबाब वाजिदअल्लीशहा ह्यास लखनौच्या गादीवरून पदच्युत केलें, आणि सर्व राज्यसत्ता कंपनीसरकाराच्या नांवानें आपल्या हातीं घेतली. नंतर त्यांनीं वाजिदअल्ली-

शहा ह्यास कैद करून ता० १३ मार्च इ० स० १८५६ रोजीं कलकत्त्यास पाठविलें. त्याची लखनौहून रवानगी झाली त्या वेळीं सर्व नागरिकांस अत्यंत दुःख झालें. त्यांनीं त्याचें शेवटचें दर्शन घेण्याची त्वरा करून त्यास " बादशहा सलामत," " बादशाहत फिर बन रहे," "लंडनसे हुकूम आजावे " वगैरे प्रेमपूर्वक आशीर्वाद दिले. त्या वेळचा हृदयद्रावक देखावा पाहून प्रत्येक स्वराज्यप्रिय प्रजाजनांच्या नेत्रांतून दुःखाश्रु आल्यावांचून राहणार नाहींत!

नबाब वाजिदअल्ली ह्यास पदच्युत केल्यानंतर त्याचा भाऊ मिर्झा शिकंदर हशमत बहादूर व त्याची आई जनाब औलिया बेगम ह्या उभयतांनीं इंग्लंडच्या महाराणीसाहेबापांशी दाद मागण्याकरितां अत्यंत परिश्रम केले; व स्वतः इंग्लंडमध्यें जाण्याची तसदी घेतली. परंतु त्यांच्या प्रयत्नास यश न येऊन ते प्यारिस येथें परत आले व तेथेंच मृत्यु पावले. नबाब वाजिदअल्लीशहा हा कवि मोरोपंत ह्यांनीं म्हटल्याप्रमाणें:—

" हांसत कर्म करावें, भोगावें रडत तेंच परिणामीं "

ह्या व्यवहारनियमाप्रमाणें आपल्या नीच कर्मांचीं फळें भोगण्याकरितां कलकत्ता येथें गेला. तेथें गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं लखनौ येथें बंड झालें व त्याजवर राजद्रोहाचा आरोप आला. पुढें त्यास राजकीय कैद प्राप्त होऊन तो फोर्ट उइल्यम नामक कलकत्ता येथील प्रसिद्ध किल्ल्यामध्यें बंदिवासांत पडला. परंतु हिंदुस्थानचे शांत व दयाळू गव्हरनर जनरल लॉर्ड क्यानिंग ह्यांनीं त्यास ता० २ जुलई इ० स० १८५९ रोजीं प्रतिबंधांतून मुक्त करून 'गार्डन रीच' नामक एका उत्तम राजवाड्यांत ठेविलें. तेथें त्यास १२ लक्ष रुपये पेनशन मिळत असे. त्याचा स्वीकार करून आपल्या आयुष्याचे दिवस कंठीत तो तेथें बरींच वर्षें राहिला होता. शेवटीं

त्याजवर मृत्यूची मेहेरबानी होऊन तो आपल्या करुणास्पद, वैभवहीन व पारतंत्र्ययुक्त स्थितींतून ता० २१ सप्टंबर इ० स० १८८७ रोजीं मुक्त झाला. त्याचे वंशज अद्यापि हयात असून 'अयोध्येचे नबाब' ह्या नांवानें उत्तर हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं कित्येकांवर ब्रिटिशसरकारची कृपा असून ते त्यांच्या सन्मानास व बड्या बड्या किताबासही पात्र झाले आहेत.

येणेंप्रमाणें नबाब वाजिदअल्लीशहा ह्याच्या दुर्दैवी चरित्राची कथा आहे. ह्यावरून पुष्कळ गोष्टींचा बोध घेण्यासारखा आहे. त्यांत मुख्यत्वेंकरून दुराचाराचा परिणाम कधींही चांगला होत नाहीं हें उत्तम प्रकारें शिकण्यासारखें आहे. तें प्रत्येकानें अवश्य लक्ष्यांत ठेवून सुसंगति व सद्विचार ह्यांचा सदैव स्वीकार करावा व आपलें वर्तन सत्य, सरल, आणि शुद्ध असें ठेवावें; म्हणजे त्यास सत्कीर्ति प्राप्त होऊन त्याचा शेवट अत्यंत सुखदायक व आनंदप्रद झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं.

---

# भाग १२ वा.

## उपसंहार.

अयोध्येचें राज्य खालसा केल्यानंतर तेथें ब्रिटिश अंमल सुरू झाला. परंतु ही गोष्ट स्वराज्यसुख उपभोगलेल्या प्रजेस पसंत वाटली नाहीं. वाजिदअल्लीशहाची कारकीर्द इतकी जुलमाची व अंदाधुंदीची झाली, तथापि तिच्या मुळें लखनौच्या भरभराटीस किंवा व्यापारास कमीपणा आला नाहीं. त्याचप्रमाणें अयोध्येंत कितीही जुलूम झाले किंवा अन्याय झाले तरी देशांतील द्रव्य देशाबाहेर गेलें नाहीं; त्यामुळें तेथील सांपत्तिक स्थितींत फारसा फरक पडला नाहीं. ह्या कारणांस्तव नवीन राज्यक्रांति तेथील लोकांस पथ्यकर न वाटणें साहजिकच आहे. राज्यसुधारणेच्या दृष्टीनें राज्यव्यवस्थेंत फेरबदल होणें जरूर होतें, परंतु सर्वस्वीं राज्यक्रांति होणें किती अवश्य व न्याय्य होतें हा मोठाच प्रश्न आहे. त्याचा विचार करण्याचें प्रकृत स्थल नाहीं, तथापि स्थूलमानानें लखनौच्या नबाबापासून तों कमी दर्जाच्या नौकरापर्यंत हा राजकीय फेरफार कोणांस प्रिय झाला नाहीं, असें त्यांच्या भावी वर्तनावरून व इंग्लंडांतील चळवळीवरून व्यक्त होतें.

नबाब वाजिदअल्ली ह्यास इंग्रजसरकारानें लखनौच्या गादीवरून अन्यायानें पदच्युत केलें व अयोध्येचें राज्य विनाकारण खालसा केलें, असें दाखविण्याबद्दल इंग्लंडमध्यें पुष्कळ चळवळ झाली; व नबाबाच्या वतीनें तेथें मेजर बर्ड, मेंझेस, माल्कम् ल्युविन, वगैरे कित्येक युरोपियन लोकांनीं पुष्कळ खटपट केली. त्याचप्रमाणें नबाबानें व त्याच्या पदरच्या मसीउद्दीन नामक एका हुशार मनुष्यानें, अयोध्येच्या

राज्यांतील अव्यवस्थेसंबंधानें व जुलमासंबंधानें कर्नल स्लीमन व जनरल औट्राम ह्यांनीं जे आरोप आणिले होते, ते असत्य आहेत असें दाखविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. त्या योगानें अनेक नवीन गोष्टी बाहेर येऊन, त्यांत नबाबाच्या पक्षास अनुकूल असा इंग्रजी कागदपत्रांचा पुरावाही प्रसिद्ध झाला आहे. त्यावरून नबाबाच्या पक्षास बरीच पुष्टि येते; व इंग्रज अधिकाऱ्यांची कृति अन्याय व स्वार्थेच्छा ह्यांच्या विरहित नव्हती असें मानण्यासही जागा मिळते. परंतु ज्या अर्थीं कांहीं निःपक्षपाती व सत्यप्रिय इंग्रजलोकांनीं एतद्देशीय राज्यें खालसा करण्याच्या विरुद्ध आपलें मत प्रदर्शित केलें आहे; त्या अर्थीं ह्या राज्यकारणाच्या गोष्टींची आतां चर्चा करण्यांत अर्थ नाहीं. तथापि, 'कांहीं गुण सोन्याचा व कांहीं सोनाराचा' ह्या म्हणीप्रमाणें, लखनौ संस्थानच्या बाबतींत प्रकार झाला असें समदृष्टीच्या माणसास वाटल्यावांचून राहत नाहीं. इंग्रज अधिकाऱ्यांच्या म्हणण्याप्रमाणें, अयोध्येची स्थिति अत्यंत दुर्धर नसली, तरी ती समाधानकारक नव्हती हें जितकें खरें आहे, तितकेंच अयोध्येच्या नबाबाचा पूर्वापार चालत आलेला तह रद्द करून व त्यांचे उपकार एकीकडे ठेवून तें सर्वस्वीं खालसा करण्यापेक्षां, तें कायम ठेवून त्यांत सुधारणा केली असती, तर अधिक चांगलें झालें असतें, हेंही खरें आहे. हें सिद्ध करून दाखविण्यास महाराष्ट्रांतील एका प्रतिष्ठित व राजमान्य सरदाराची साक्ष ह्या वेळीं लक्ष्यांत घेण्यासारखी आहे. हे सरदार श्रीमंत रघुनाथराव अण्णासाहेब विंचुरकर हे होत. हे बंडाच्या अगोदर कांहीं दिवसांपूर्वी स्वतः लखनौस गेले होते व त्यांनीं वाजिद्-अल्लीशहाची कारकीर्द समक्ष पाहिली होती. त्यांच्या प्रवासाचें वर्णन अयोध्येचें राज्य खालसा झाल्यानंतर कित्येक वर्षांनीं प्रसिद्ध झालें आहे. त्यांत पुढील लेख सांपडतो:—

" रघुनाथराव लखनौस गेले त्या वेळीं तेथें अत्यंत अनीति चालू होती. त्या शहरीं गरीब रयतेवर तेथील नबाबाच्या अंमलदार लोकांचा मोठा जुलूम असे. रघुनाथराव ह्यांनीं सूर्योदयापूर्वी मुक्कामाचे जागीं जाण्याकरितां या शहरांत प्रवेश केला. तेव्हां एक भाजीवाला वांग्यांनीं भरलेली गाडी घेऊन तीं विकण्याकरितां बाजारांत जात होता. त्या वेळीं असें झालें कीं, दरवाजाचे चौकीदार कोतवालाचे शिपाई, शहरचे रखवालदार, दिवाणाचे शिपाई, काजीचे शिपाई वगैरेनीं ठिकाठिकाणीं तीं वांगीं लुचाडून घेतलीं. त्यामुळें भाजीवाला ती गाडी घेऊन बाजारांत पोहोंचेतोंपर्यंत त्या गाडींत टोपलीभर देखील वांगीं विकण्यास राहिलीं नाहींत! असे कितीएक अन्यायाचे प्रकार रघुनाथराव ह्यांनीं तेथें पाहिले! शहरचे वस्तींतून तेथील अमीर लोकांचे मुलांनीं भरधांव घोडे पिटीत फिरावें! त्यांत कधीं वृद्ध लोक व लहान मुलें सांपडून मरत! अशा प्रकारचे खून झाल्यावांचून एकही दिवस जात नसे! तेव्हां तें शहर अनीतीचें व लुच्चे लोकांचें केवळ घरच होतें असें दिसतें. हे सर्व प्रकार पाहून पुढें कांहीं दिवसांनीं इंग्रजांनीं तें राज्य खालसा केलें! लखनौ येथील नबाबाचें राज्य त्याजकडेसच कायम ठेवून, त्याचे राज्यांत जी अनीति व अंदाधुंदी चालू होती, तिचा मात्र बंदोबस्त करून इंग्रज सरकारानें व्यवस्था केली असती, तर त्याची विशेष कीर्ति होऊन त्याचें हित झालें असतें; आणि सन १८५७ सालीं जें मोठें बंड झालें, त्यास लखनौचें राज्य खालसा करणें हें एक अंशतः कारण झालें असें जे मानितात, त्यांस तसें मानण्यास जागा राहिली नसती."

ह्या लेखावरून आमच्या म्हणण्यास अधिक बळकटी येते. अयोध्येचें राज्य न्यायानें किंवा अन्यायानें खालसा झालें त्याबद्दल अधिक चर्चा करण्यांत आतां अर्थ नाहीं. तथापि झालेल्या गोष्टीच्या परि-

णामाचा विचार करणें अत्यंत जरूर आहे. नबाब वाजिदअल्ली-शहा ह्यास पदच्युत केल्यानंतर अयोध्येचीं राज्यसूत्रें जनरल औट्राम ह्यांनीं आपल्या हातांत घेतलीं, हें मागें सांगितलेंच आहे. त्यांनीं व त्यांच्या अनुयायांनीं अयोध्येच्या नबाबाचें जें सैन्य होतें तें कमी केलें; पूर्वींचा दिवाण अल्लीनकीखान, राजा बालकिशन व बाबू पूरणचंद्र वगैरे जुन्या लोकांस हुद्यावरून दूर केलें; अयोध्येच्या तालुकदारांवर वसुलाची एकदम सक्ती केली; आणि स्वराज्याचा उपभोग घेतलेल्या राजवंशीय व स्वाभिमानी जुन्या लोकांस फार वाईट रीतीनें वागविलें; त्यामुळें सर्व लोकांचीं मनें क्षुब्ध झालीं व त्या योगानें इंग्रजांविषयीं त्यांच्या हृदयांत द्वेषाग्नि उत्पन्न झाला. त्याचें भयंकर व विक्राळ स्वरूप पुढें कसें व्यक्त झालें व त्याच्या शमनार्थ किती जीव बळी पडले, हें इ० स० १८५७।५८ च्या बंडाच्या इतिहासावरून कळून येण्यासारखें आहे. सर जॉन के, म्यालिसन, वगैरे इतिहासकारांनीं त्याचें साग्र वर्णन केलें आहे. तें वाचलें असतां, एतद्देशीय संस्थानें खालसा करून प्रजेचीं मनें क्षुब्ध करणें राजकर्त्यांस किती अनर्थास्पद होतें, हें चांगलें व्यक्त होतें. त्याचा बोध आमच्या कृपाळू राज्यकर्त्यांनीं घेतला आहे, व त्याप्रमाणें प्रजेस सुखी व संतुष्ट करण्याकरितां इ० स० १८५८ सालीं "राणीचा जाहीरनामा" प्रसिद्ध केला आहे. त्यांत दिलेलीं वचनें उत्तम प्रकारें पाळून हिंदुस्थानच्या प्रजेस संतुष्ट करावें, व तिचें प्रेम संपादन करावें हें त्यांचें कर्तव्य आहे. आणि प्रजाजनांनींही कालचक्राच्या फेऱ्यानें जी स्थिति प्राप्त झाली आहे तींत आनंद मानून आपल्या राज्यकर्त्यांविषयीं पूर्ण राजनिष्ठा बाळगणें व त्यांचें अभीष्टचिंतन करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. हीं उभयकर्तव्यें राजा व प्रजा ह्यांच्याकडून झालीं म्हणजे त्यांत उभयतांचें कल्याण आहे.

समाप्त.

# स्थलवर्णन.

## १. अयोध्या.

अयोध्या ही प्राचीन पुराणप्रसिद्ध नगरी सांप्रत वायव्य प्रांतांतील फैजाबाद जिल्ह्यांत फैजाबाद शहरानजीक पांच सहा मैलांवर आहे. काशीहून लखनौकडे, जाणारा औध-रोहिलखंड रेलवे म्हणून जो रेलवेचा रस्ता आहे, त्या रस्त्यावर लखनौच्या अलीकडे ८९ मैलांवर फैजाबाद हें स्टेशन आहे. येथून अयोध्या-गावांत जाण्यास उत्तम रस्ता असून वाहनें वगैरे चांगलीं मिळतात. फैजाबाद हें अयोध्येच्या नबाबाच्या कारकीर्दीत इ० स० १७२४-इ० स० १७७५ पर्यंत राजधानीचें शहर असल्यामुळे तेथील गतवैभवदर्शक कित्येक स्थळे पाहण्यासारखीं आहेत. ह्या शहरास 'बंगला' असेंही नांव आहे. अयोध्या येथें शरयू नदी असून तिच्यामध्यें 'स्वर्गद्वार' म्हणून एक मोठें तीर्थ आहे. तेथून श्रीरामचंद्र आपलें अवतारचरित्र समाप्त करून स्वर्गास गेले. म्हणून त्यास 'स्वर्गद्वार' असें नांव पडलें आहे. त्याचे माहात्म्य अयोध्यापुराणात वर्णन केलें आहे. रामचंद्राचे जन्मस्थान येथेंच असल्यामुळें हें स्थळ फार पुण्यदायक मानिलें जातें, एवढेंच नव्हे तर अयोध्यानगरी ही पुराणांतरीं वर्णन केलेल्या

"अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका ॥
पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायकाः" ॥ १ ॥

ह्या सात मोक्ष देणाऱ्या नगरींमध्यें आद्यस्थानीं गणलेली आहे. ह्या प्रांताचें प्राचीन नांव उत्तर कोसल असें आहे. रामचंद्राच्या वेळची अयोध्या आतां मुळींच राहिली नाहीं. रामायणांत ज्या अयोध्येचें वर्णन दिलें आहे ती इसवी सनापूर्वी ५०० वर्षांची अयोध्या अद्यापि असेल ही कल्पनाही संभवत नाहीं. तथापि अयोध्येइतकें प्राचीन शहर दुसरें कोणतेंच नाहीं. ही गोष्ट अगदीं सिद्ध आहे. पूर्वीची अयोध्या दोन तीन वेळां उध्वस्त झाली होती, अशीही माहिती मिळते. वैवस्वतानें इ० स० पूर्वी १३६६ ह्या वर्षी ही नगरी

प्रथमतः वसविली, असें लिहिलें आहे, पण त्याबद्दलची विश्वसनीय माहिती मिळणें कठीण आहे. नवीन अयोध्या विक्रमादित्य राजानें इ० स० पूर्वी ५७ व्या वर्षी बांधली असा जो लेख सांपडतो तो मात्र बराच भरंवसा ठेवण्यासारखा दिसतो. यवनांच्या कारकीर्दीमध्ये ही सुप्रसिद्ध नगरी अनेक वेळां उध्वस्त झाली होती. विक्रमादित्य राजानें बांधलेली अयोध्या ही प्रस्तुतच्या अयोध्ये-पासून एक दोन मैल लांब होती, असें म्हणतात. फैजाबादेजवळ जुन्या इमारतीचें सामान जे जमिनीमध्ये दृष्टीस पडतें तें पूर्वीच्या अयोध्येचें दर्शक होय, असे प्राक्कालीन वस्तुशोधकांचे मत आहे. विक्रमादित्य राजानें जी नगरी वसविली तीमध्यें ३६० देवालयें बांधिलीं होतीं. पण तीं देवालये यव-नांच्या कारकीर्दीत जमीनदोस्त होऊन त्यांच्याच सामानानें पुढें औरंगजेबानें मशिदी बांधल्या, असे इतिहासावरून दिसून येतें. अयोध्येमध्यें प्रस्तुत प्राचीन देवालयें फार थोडीं आहेत. हनुमानगड व रामगड अशीं जीं दोन स्थळें येथें दृष्टीस पडतात तीं मात्र बरींच प्राचीन असावींत, अशी कल्पना आहे. ह्या दोन स्थळांपैकीं हनुमानगड, ज्यास तेथील लोक 'हनुमानगढी' म्हण-तात तें मात्र सध्यां अस्तित्वांत आहे. दुसरें रामगड हें नाममात्र राहिलें आहे. त्या स्थळीं पूर्वी रामजन्मस्थान होतें. परंतु तें नष्ट करून त्यावर औरंगजेब बाद-शहानें मशीद बांधली आहे. येथून जवळच मणिपर्वत, कुबेरपर्वत आणि सुग्रीवपर्वत अशीं जुनीं स्थानें आहेत, परंतु त्यांमध्यें दर्शनीय अशी एकही गोष्ट राहिली नाहीं.

सांप्रतची अयोध्या ही एक जुनाट, वैभवहीन व सौंदर्यरहित अशी लहानशी नगरी आहे. रामायणामध्यें,

> कोशलो नाम मुदितः स्फीतो जनपदो महान् ॥
> निविष्टः शरयूतीरे प्रभूतधनधान्यवान् ॥ १ ॥
> अयोध्या नाम नगरी तत्रासील्लोकविश्रुता ॥
> मनुना मानवेन्द्रेण या पूरी निर्मिता स्वयम् ॥ २ ॥

म्हणून ज्या नगरीचें वर्णन केलें आहे त्या नगरीचा आतां मागमूसही राहिला नाहीं. प्रस्तुत येथें लहान लहान पण जीर्ण अशा गृहपंक्ति दिसत असून दारिद्र्याव-स्थेनें गांजलेले नागरिक जन मात्र दृष्टीस पडतात. ह्यावरून हें सर्व स्थित्यंतर

मुसलमानांच्या कारकीर्दीत झालें असून, आतां ह्या नगरीमध्यें प्राचीन सौंदर्य-दर्शक एकही चिन्ह राहिलें नाहीं, असें स्पष्ट म्हणणें भाग पडतें.

प्रासादैरत्नविकृतैः पर्वतैरिव शोभिनाम् ॥
कूटागारैश्च संपूर्णामिंद्रस्येवामरावतीम् ॥ १ ॥

अशी नगरी आतां दारिद्र्याचे वसतिस्थान बनावें ही कालाची केवढी अजब लीला आहे बरें ?

वाल्मीकिरामायणांतील अयोध्येचें वर्णन ऐकल्यामुळें प्रत्येक प्रेक्षकास अयोध्यादर्शनाची उत्कंठा अतितर असते. परतु ती सांप्रतच्या अयोध्यानगरींत प्रवेश केल्याबरोबर लागलीच कमी होते. प्रस्तुत ह्या पुण्यकर क्षेत्रामध्यें नेत्रानंददायक स्थलें फारशी नाहींत, तथापि भक्तिभावाने जाणाऱ्या यात्रेकरूस हृदयाल्हादकारक अशीं देवालयें बरींच आहेत. त्यांत 'हनुमानगढी' ही प्रमुख होय. येथें पूर्वी 'रामगढी' व 'हनुमानगढी' अशा दोन गढ्या असून त्यांत श्रीराम व त्यांचा भक्त हनुमान् ह्यांची देवालयें होतीं. त्यांपैकी यवनांच्या कारकीर्दीत रामगढीचा नाश झाला. आतां फक्त हनुमानगढी हेंच देवस्थान पाहण्यासारखे राहिले आहे. ही गढी केवळ किल्ल्याप्रमाणें भव्य असून आपल्या प्राचीनत्वाची साक्ष ठिकठिकाणीं देत असते. ह्या गढीचे प्रचंड बुरूज व तोफेसही हार न जाणाऱ्या खबीर भिंती दूरवर दिसत असतात. ह्या गढीचा दरवाजा अत्यंत मोठा असून त्यांतून वर जाण्यास दगडी पायऱ्या आहेत. त्या चढून वर गेले म्हणजे रामदूत श्रीहनुमान् ह्याचें एक देवालय दृष्टीस पडतें. हें देवालय लहानच आहे, तरी त्याचे बांधकम सर्वोत्कृष्ट असून ते प्रेक्षकांचें रंजन केल्यावांचून रहात नाहीं. ह्या मंदिराचा कळस सुवर्णमय असल्यामुळें त्याची प्रभा दिनकराच्या दिव्यतेजानें आसमंतात् प्रदेशी चमकत असते. येथें एक भगवी ध्वजा लाविली आहे. ती वायूच्या लहरीबरोबर एकसारखी फडकत असते. त्यावरून जणूं पवन स्वपुत्राची (अंजनीसुताची) अद्वितीय रामभक्ति प्रेमानें गात आहे, असा भास होतो !

ह्या देवालयामध्यें हनुमताची प्रचंड मूर्ति असून तिचा पूजाअर्चादि समारंभ फार प्रेक्षणीय असतो. हनुमंताचें मुख व नेत्र इतके तेजस्वी आहेत कीं, त्या योगानें प्रेक्षकाचें हृदय हर्षभरित होऊन त्या स्वरूपाचे कितीही दर्शन घेतले तरी

नेत्रांची तृप्ति होत नाहीं. देवाचे अलंकार व पोषाख बहुमूल्य असून पुण्यदिनीं त्यांचा उपयोग करीत असतात. हें स्थान इतकें शांत व रम्य आहे कीं, तेथें भक्तिमान् दर्शनोत्सुकांचीं हृदयें आनंदानें भरून जातात ह्या देवालयाच्या पुढील भागांत श्रीरामचंद्रजी, लक्ष्मण व सीता ह्यांच्या मूर्ति आहेत. त्या मूर्ति अगदीं लहान असून त्यांचें मंदीरही अगदीं लहान आहे. ह्या श्रीरामचंद्रजीच्या नगरीमध्यें रामसेवकाचेच महात्म्य विशेष आहे. ह्यावरून परमेश्वरास भक्ताची प्रीति जास्त आहे असे दिसून येतें. ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे कीं, ज्या भक्ताचा परमेश्वराच्या ठायीं निस्सीम भाव असतो त्यास परमेश्वर 'मस्तकींचा मुकुट करीन मी' असें म्हणत असतात. त्याचें हें प्रत्यक्ष उदाहरण होय! असो. ह्या उच्च स्थलावरून दूरवरचा फार मनोहर देखावा दृष्टीस पडत असतो. त्याचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे.

हनुमानगढीशिवाय येथे सप्तहरींची स्थाने फार प्रसिद्ध आहेत. नागेश्वर महादेव ह्या नांवाचें एक शिवस्थान आहे, तेथें महाराष्ट्र ब्राह्मण दृष्टीस पडतात; पण ते याचनावृत्तीमध्ये गढून गेले आहेत. अयोध्येमध्यें राममदिरें तर पुष्कळच आहेत. त्या सर्वांचे उत्सव रामनवमीमध्यें सुरू होतात. त्या वेळीं अयोध्येस हजारों यात्रा जमत असते. बैरागी लोकाचे मेळे येथें फारच आहेत. त्यांचें माहात्म्य पूर्वी विशेष असून त्यांचे निरनिराळे पंथ व त्या प्रत्येक पंथाचे वेगवेगळे आखाडे असत. त्यांत निर्वाणी, निर्मोही, दिगंबरी, खाकी, महानिर्वाणी, संतोखी, निरालंभी हे पंथ फार प्रसिद्ध असून त्या प्रत्येक पंथाचे निरनिराळे आचार्य असत व त्यांचा फार मान असे. पुढें पुढे त्यांचें प्रस्थ बरेंच कमी झालें. तथापि इंग्रज अंमल होण्यापूर्वी सुग्रीवकिल्ला, रामप्रसादका काना व विद्याकुंड येथें अनुक्रमें १००, १५०, २०० बैरागी मोठे मानकरी असत. इ० स० १८५५ सालीं येथें बैरागी व मुसलमान लोकांमध्यें मोठ्या मारामाऱ्या झाल्या. त्यामुळेंच येथें इंग्रज सरकारचा बंदोबस्त कडेकोट झाला आहे. बहुविध राममंदिरांशिवाय येथें तीर्थें व रामकुंडें अनेक आहेत. ह्या सर्व ठिकाणीं यात्रेकरूंना क्षेत्रविधि करावे लागतात.

अयोध्येंतील सृष्टिसौंदर्याचा सर्वांत उत्तम देखावा शरयूतीरीं दृष्टीस पडतो. प्रातःकाळीं व सायंकाळीं येथें जो उदात्त, सुशांत व आल्हाददायक देखावा

दृष्टीस पडतो, तो वर्णन करणें कठीण आहे! नदीच्या एका तीरावर सर्व देवालयें एका ओळीनें बांधलेलीं असल्यामुळें त्यांचीं उच्च उच्च शिखरें जणों गगनमंडलास भेदीत आहेत; एकीकडे हिरवींगार शेतें आपल्या हरितप्रभेनें पृथ्वीस शालू नेसविल्याचें भासवीत आहेत; शरयूच्या पश्चिमतीरावरील देवालयांतून गंभीर घंटारव ऐकूं येत आहेत; निरनिराळ्या कुंडावर व घांटावर तद्देशीय ब्राह्मण व गोसावी संध्यावंदनांत निमग्न झालेले दिसत आहेत; कोठें जटाजूट धारण केलेले साधुजन श्रीरामभक्त तुळसीदास ह्यांचीं प्रासादिक पद्यें म्हणत आहेत; असा तो रमणीय देखावा कोणाचें हृदय संतुष्ट करणार नाही!

रामचंद्राच्या लीलेसंबंधानें एतद्देशीय लोक हजारों स्थळें दाखवितात व प्रत्येक ठिकाणीं 'महाराज, दर्शन करो' म्हणून विनंति करितात; परंतु तेथें पूर्वीच्या रामलीला झाल्या असतील कीं नाहीं ह्याबद्दल सुज्ञ यात्रिकांस निराळा विचार करण्याचें कारणच नाहीं. खरी अयोध्या जी आहे तिचें उत्तररामचरित्रांत म्हटल्याप्रमाणें:—

पुरा यत्र स्रोतःपुलिनमधुना तत्र सरिताम्
विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम्।
बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदम्
निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ॥

इतकें रूपांतर होऊन गेलें आहे. तेव्हां तींत घडलेल्या सर्व रामलीला दाखविण्यास कोण समर्थ आहे? तथापि महाकवि वाल्मीकि ह्यांनीं आपल्या सुरस वाणीनें जें रामचरित्र वर्णिलें आहे तें प्रत्येक हिंदु हृदयांत पूर्णपणें प्रतिबिंबित झाल्यामुळें कल्पनादृष्टीस तें येथें घडलें असेल असें भासून चित्तास आनंद वाटतो. ह्यावरून कवि वाल्मीकि ह्यांच्या कृतीची थोरवी अगाध आहे असें वाटून त्यांच्या चरणीं प्रत्येकास लीन व्हावें अशी इच्छा होते.

कूजन्तं राम रामेति मधुरं मधुराक्षरम्।
आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम् ॥ १ ॥

---

# २ लखनौ.

हें उत्तर हिंदुस्थानांतील नामांकित शहरांपैकीं एक शहर आहे. येथें अयोध्येच्या नबाबांची राजधानी होती त्यामुळें तें इतिहासप्रसिद्ध व प्रेक्षणीय झालें आहे. हें औंध-रोहिलखंड रेलवेचे मुख्य ठिकाण असून येथें येण्यास काशी-फैजाबाद, कानपूर-लखनौ, किंवा अलीगड-बरेली असे रेलवेचे तीन रस्ते आहेत. हें शहर अतिशय विस्तीर्ण असून ह्याचें क्षेत्रफळ सुमारें १३ मैल आहे. येथील लोकवस्ती इ०स० १८९१ च्या खानेसुमारीप्रमाणें २,७३,०२७ असून त्यांत १,६१,८९६ हिंदु व १,०४,१९८ मुसलमान आहेत. येथील मुसलमानलोकांची वस्ती नबाबाच्या राज्यामुळें फार वाढली होती. हे बहुतेक शिय्या पंथाचे आहेत. हिंदु व मुसलमान असा लखनौच्या नबाबांच्या कारकीर्दींत फारसा भेदभाव नसल्यामुळे त्यांच्यामध्यें जातिमत्सराचें बंड फारसें नाहीं. अयोध्येच्या राज्यात हिंदु व मुसलमान ह्याची मारामारी फक्त इ० स० १८५५ साली वाजिदअल्लीशहा ह्याच्या कारकीर्दींत काय ती एक वेळ झाली. ह्यावरून उभय जातींमध्यें परस्पर प्रेमभाव पूर्वापार वसत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. लखनौ शहर गोमती नदीच्या कांठीं वसलें असून तें फार प्राचीन आहे असें मानितात. हें श्रीरामाचा बंधु लक्ष्मण ह्यानें वसविलें म्हणून त्यास 'लक्ष्मणपूर' असें नांव पडलें, व त्याचा अपभ्रंश लखनौ असा झाला असावा असें प्राक्कालीन इतिहाससंशोधकांचें मत आहे. पूर्वी येथें लक्ष्मणकिल्ला, ज्यास तद्देशीय लोक 'लक्ष्मणतिल्ला' असें म्हणतात, ह्या नांवाचा एक प्राचीन किल्ला होता, त्यावर अयोध्येच्या राज्याचा संस्थापक सादतखान ह्यानें 'मच्छीभवन' नामक किल्ला बांधिला व हें शहर वसविण्यास प्रारंभ केला, अशी इतिहासावरून माहिती समजते. पुढें अयोध्येच्या नबाबांचा जसजसा उत्कर्ष झाला तसतसें हे शहर भरभराटीस येऊन, राज्यवैभव आणि कलाकौशल्य ह्यांचें आगरच होऊन राहिलें. येथें नबाब असफउद्दौला ह्यानें इ० स० १७७५ ह्या वर्षी आपली राजधानी केली. येथील भव्य व प्रचंड राजवाडे, रमणीय उद्यानें आणि नानाविध सुंदर स्थळें, ह्यांच्या योगानें प्रवासीज-

नांस हें एक कौतुकास्पद स्थान वाटत आहे. ह्यांपैकीं कित्येकांनीं त्याची तुलना मास्को अथवा कान्स्टटिनोपल ह्याशीं केली आहे. येथील प्राचीन इमारती अद्यापि सुस्थितींत असून त्यापैकीं कित्येक अत्यंत प्रेक्षणीय आहेत. त्यांचें संक्षिप्त वर्णन येथे सादर केलें आहे.

## इमामवाडा.

अयोध्येच्या नबाबाच्या अपार संपत्तीचे द्योतक आतां फक्त लखनौ येथे दीन स्थितींत असलेले भव्य व प्रचंड राजवाडेच होत, असे म्हटले तरी चालेल. ह्या राजवाड्यांमध्यें आपल्या सौंदर्यानें प्रेक्षकांस थक्क करून सोडणाऱ्या इमारती तीनचारच आहेत. इमामवाडा, छत्तरमंझील, कैसरबाग, दिलखुष राजवाडा, लालबारद्वारी, वगैरे इमारती केवळ अप्रातिम आहेत. त्याचप्रमाणें इ० स० १८५७ सालच्या बंडानें इतिहासप्रसिद्ध झालेली लखनौ येथील "रेसिडेन्सी" नामक इमारत हीही अवलोकन करण्यासारखी आहे. ह्या सर्वांत इमामवाडा तर सर्व कलाकौशल्याचे आगरच आहे. ही इमारत नबाब असफउद्दौला ह्याच्या कारकीर्दीत बांधली आहे. असफउद्दौला फार धनाढ्य व चैनी होता. एक वेळ त्याच्या मनांत असे आलें कीं, दुसरीकडे कोठे ज्या नमुन्याची इमारत झाली नाहीं व जिचा नमुना पुढेंही कधीं कोणास बनवितां येणार नाहीं अशी अद्वितीय इमारत बांधावी. वजीरसाहेबांच्या मनांत ही गोष्ट आली मात्र, कीं "राजा बोले व दळ हाले" ह्या म्हणीप्रमाणें हजारों चतुर कारागीर जमा झाले. त्यात किफायतउल्ला नामक एक अचाट बुद्धीचा इसम सरकारस्वारीपुढें आला व त्यानें सर्व कारागिरांचे नमुने व बेत नापसत करून स्वतःच्या कल्पनेनें एक अद्भुत व अलौकिक इमारतीचा नमुना तयार करून दाखविला. तो सर्वानुमतें पसंत ठरून त्याप्रमाणें एक सुंदर व भव्य इमारत सन १७८६ सालीं बांधण्यांत आली. तीच इमामवाडा ही होय. ह्या सालापूर्वी दोन वर्षे हिंदुस्थानांत दुष्काळ पडला होता, तेव्हां त्या वेळीं अन्नान्न झालेल्या लोकांनीं कामावर यावें अशा हेतूनें ही प्रचंड इमारत बांधण्याचा बेत असफउद्दौल्यानें केला होता असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं.

कोट्यवधि रुपये खर्च करून झालेली इमारत किती अप्रतिम व मनमोहक

झाली असेल ह्याची कल्पना करणेंही कठीण आहे. ह्या इमारतीमध्यें एक फार सुंदर व भव्य असा १६३ फूट लांबीचा व ५३ फूट रुंदीचा दिवाणखाना आहे. त्याची नक्षी व एकंदर काम फार सुरेख आहेच. तथापि त्यांतल्या त्यांत, विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, एवढा मोठा दिवाणखाना निराधार आहे, म्हणजे त्याच्यामध्यें खांब वगैरे मुळींच नाहींत; एवढेंच नव्हे, पण ह्या इमारतींत कोठेंच लांकूड नाहीं. त्यामुळें युरोपखंडांतले सर्व प्रवासी ह्या इमारतीची अत्यंत प्रशंसा करितात. आणि अशी इमारत सर्व युरोपखंडामध्यें नव्हे, पण सर्व जगामध्यें कोठेंही नाहीं असें स्पष्टपणें कबूल करितात. ह्या इमारतीचें प्रचंड स्वरूप पाहून प्रेक्षकांस एकदम फार आश्चर्य वाटतें. ह्या भव्य इमारतीमध्यें प्रवेश करून मध्यभागीं आलें म्हणजे अपूर्व कौतुक वाटतें. मोठ्या कल्पकतेनें तयार केलेल्या वातायनांतून प्रकाशलहरी आंत येऊन ह्या प्रचंड इमारतीस अत्यंत प्रकाशित करितात. ह्या सौंदर्यमंदिराच्या भिंतीस पूर्वी रजतसुवर्णाचें पाणी देऊन त्यावर सुंदर वेलबुट्टी काढली होती. आतां ती बिलकुल राहिली नाहीं, तरी क्वचित् क्वचित् रौप्यतेज दृष्टीस पडतें. ज्या वेळीं दिनमणिकिरणांची अत्युज्ज्वल प्रभा परावर्तन पावून ह्या मंदिरामध्यें झळकूं लागते त्या वेळीं नेत्रांस परम आल्हाद वाटतो. लखनौचें राजवैभव कायम होतें त्या वेळीं वैभवालंकृत स्थितीमध्यें ज्यांनीं ही सुंदर इमारत पाहिली होती त्यांना तिचें विशेष सौंदर्य अवलोकन करून अत्यानंद झाला असेल, ह्यांत शंका नाहीं. सन १८२४ सालीं बिशप हिबर ह्या प्रसिद्ध व शोधक बुद्धीच्या प्रवाशानें ह्या इमारतीचें वैभव अवलोकन केलें होतें. त्यानें तिचें वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहे:—

"Through the open marble arches nothing else was, at first, visible. The whole building was hung with them: immense pyramids of silver, gold, prismatic crystals, and colored glass; and where they were too heavy to be hung, they rose in radiant piles from the floor. In the midst of them were temples of silver filagree, eight or ten high, and studded with cornelians, agates and emeralds......There were ancient banners of the Nawabs of Oudh, heavy with sentences from the Koran, embroidered on gold gigantic hands of silver covered with the name of God;

swords of Khorsan, steel-lances, and halberds, the turbans of renowned commanders; the trapping of the white horse of Naseer-ud-deen, mounted on a wooden effigy, and several pulpits of peculiar sanctity."

ह्या मूल्यवान सामानापैकीं ब्रिटिश सरकाराच्या कृपेनें थोडेंबहुत रोषनाईचें सामान, एक रुप्याचें सिंहासन, व दुसरे कांहीं जिन्नस तेथें अद्यापि शिल्लक राहिले आहेत. सन १८५७ सालचे बंडाचे वेळीं येथील मूल्यवान जिनसांचा फार नाश झाला असें म्हणतात. येथें नबाब असफउद्दौला ह्याची कबर असून तिचें मखर रुप्याचें केलें आहे. त्या मखरावर घालण्याची बहुमूल्य भरजरी चादर व इतर रत्नांचे अलंकार अद्यापि राहिले आहेत. पूर्वीच्या अपार संपत्तीच्या मानानें हे कांहींच नव्हत; तथापि ज्यांना प्राचीन वैभवाची कांहींच कल्पना नाहीं त्यांना एवढ्याच जिनसा पाहूनही फार आश्चर्य वाटतें.

ह्या इमारतीच्या संरक्षणाकरितां कांहीं लोक ठेविले आहेत. प्रतिवर्षी येथें मोहरमाचा महोत्सव होत असतो. येथें पूर्वी एक सोन्याचा ताबूत होता, परंतु तो आतां दृष्टीस पडत नाही.

लक्ष्मीच्या चंचल स्वभावाप्रमाणें येथील सर्व संपत्ति नष्ट झाली आहे, तरी ह्या सौंदर्यपूर्ण इमारतीनें प्रेक्षकांच्या मनांत प्राचीन वैभवाची कांहींतरी कल्पना उत्पन्न होऊन कालाची कुटिल गति दिसून येते. लखनौतील ही सुंदर इमारत पाहून प्रेक्षकांस ही विश्वकर्म्यानेंच निर्माण केली आहे कीं काय असा भास होतो. खरोखर, आग्र्याचा ताजमहाल व लखनौचा इमामवाडा ह्यांच्यासारख्या लोकोत्तर इमारती आमच्या देशांतील कारागिरांच्या कुशलतेचें उत्तम प्रदर्शन होत. इमामवाड्याच्या सौंदर्याचें वर्णन जितकें लिहावें तितकें थोडेंच आहे. लॉर्ड व्हॅलेन्शिया ह्यांनीं ही सुंदर इमारत पाहून असे उद्गार काढिले कीं :—

"The Imambarah, the mosque attached to it, and the gateways that lead to it, are beautiful specimens of this architecture (light, elegant, but fantastic). From the brilliant white of the composition and the minute delicacy of the workmanship, an enthusiast might suppose that genii had been the artificers."

खरोखर रसिक व मर्मज्ञ पाश्चात्य लोक जिचें इतकें स्तुतिस्तोत्र गातात तिच्या सौंदर्याची कल्पना प्रत्यक्ष दर्शनावाचून होणे शक्य नाहीं.

## छत्तरमंझील.

इमामवाड्याखालोखाल दुसरें प्रेक्षणीय मदीर 'छत्तरमंझील' हें होय. छत्तरमंझील हे नांव पडण्याचें कारण ह्या इमारतीच्या शिरोभागाचा वर्तुलाकार व छत्रीसारखी रचना ही होत. ही सुंदर इमारत नासिरउद्दीन हैदर ह्यानें आपल्या अंत:पुरांतील प्रिय ललनांकरितां बाधली असून तिचें सर्व काम स्त्रीजातीच्या सौकुमार्यास शोभेल असेंच नाजूक व मनोहर केलें आहे. ह्या इमारतीचे दोन भाग असून त्यांच्यामध्यें एक रमणीय क्रीडोपवन होते, व त्यांत एक संगमरवरी पाषाणाचें तयार केलेले मनोल्हादक सुदर जलाशय होतें. त्यामध्यें छत्तरमझीलाची सुवर्णप्रभा प्रतिबिंबित होऊन ती त्या उद्यानास अत्यंत शोभा देत असे. ह्या राजमंदिरामध्यें कांचेचें सामान चित्रविचित्र रगाचे असून त्यानें त्यांतील निरनिराळे रंगमहाल अलंकृत केले होते. येथें सदैव चारुतर रमणींच्या बहुविध लीला चालत असत. ह्या राजवाड्यासभोंवतीं खोजे लोकांचा सक्त पाहरा असून पुरुषवर्गाचा तेथें कधींही प्रवेश होत नसे. खुद्द नबाबसाहेबाची स्वारी जवळच्या "फरहतबक्ष" नामक राजवाड्यांत राहत असून फक्त विलाससुख घेण्याकरितां ह्या राजवाड्यांत येत असे. ह्या चित्ताकर्षक इमारतीचें दर्शन घेऊन अनेक आंग्लस्त्रिया हर्षभरित होतात व तिच्या रम्य स्वरूपाची आपल्या कोमल वाणीनें फार फार प्रशंसा करीत असतात. ऑनरेबल मिस इडन ह्या आंग्लयुवतीनें आनंदभरानें असे उद्गार काढिले आहेत कीं—

"Such a place! the only residence I have coveted in India. Don't you remember reading in the Arabian Nights Zobeide bets her Garden of Delight amidst the Califa's Palace of Pictures. I am sure this was the Garden of Delight."

अर्थात् अरेबियन नाइट्स मधल्या झोबीडच्या आनंदवनाची ज्यास उपमा मिळते त्याचें वर्णन शब्दांनीं अधिक काय लिहावें! ह्या राजवाड्यामध्यें प्रस्तुत "युनायटेड सर्व्हिस क्लब" असून तेथें नृपांगनांच्या मृदुल लीलांऐवजीं आंग्लजनांचे पौरुषविहार चालत असतात. ह्या चारुतर मंदिराच्या जवळच 'गुलिस्तान-

इ–आराम' ( Heavenly Garden) आणि 'दर्शनविलास' (Pleasing to the sight ) अशा दोन रम्य इमारती नासिरउद्दीन ह्यानें आपणा स्वतःकरितां बांधिल्या होत्या. त्यांतही सांप्रत युरोपियन अधिकाऱ्यांच्या कचेऱ्या आहेत.

## कैसरबाग.

कैसरबाग राजवाडा हा लखनौचा शेवटचा नबाब वाजिदअल्लीशहा ह्यानें बांधिला. ह्याच्या इतका प्रचंड व विस्तृत राजवाडा इमामवाड्याशिवाय दुसरा एकही नाहीं. वाजिदअल्लीशहा हा व्यसनासक्त व शृंगारविषयलंपट असल्यामुळे ह्यानें आपल्या वारांगनांकरितां ह्या राजवाड्यांमध्यें निरनिराळे महाल तयार केले होते, व ते उत्तम प्रकारें सुशोभित करून तेथे विलासाची सीमाच केली होती. जुन्या कादंबऱ्यातून अत्तराचे दीप आणि गुलाबपाण्याचीं कारंजीं ह्यांचें वर्णन आढळतें, परतु येथें तीं प्रत्यक्ष वसत असत. वाजिदअल्लीशहा ह्याच्या प्रिय ललना ३६० असून त्यांच्या ह्या राजवाड्यामध्यें विविधलीला चालत असत. खुद्द यजमानसाहेबांकरितां 'चांदीवाली बारद्वारी' व 'खासमुकाम' असे दोन महाल ह्या राजवाड्यामध्यें निराळे असत. ते रुप्यानें व सुवर्णाने मढविलेले असून त्यांची फरसबंदीही रुप्याचीच असे. ह्या बहुविध अंतःपुरांसभोंवतीं लहान लहान पुष्पवाटिका केल्या असून त्यांतून सदैव सुगंधशीतल वायूच्या लहरी येत असत. ह्याच राजवाड्यामध्यें चिनीबाग, हजरतबाग वगैरे जीं उद्यानें होतीं ,तेथें नेत्रांचें समाधान होण्याकरितां नानातऱ्हेचे पुतळे, विविध देशांतील मनोहर चित्रें, आणि हरिणें, मयूर वगैरे पशुपक्षीही ठेविले असत. तात्पर्य, मृच्छकटिक नाटकांत वसंतसेनेच्या वाड्याचें वर्णन केलें आहे तें येथें प्रत्यक्ष अवलोकन करण्यास मिळत असे. येथें सदोदित कर्णमनोहर वाद्यरव आणि सुस्वर संगीत ऐकूं येत असे. वाजिदअल्लीशहा ह्याचा दरबार चतुर मुत्सद्दी, रणशूर सेनापति किंवा विद्वान् पंडित ह्यांचा नसून यौवनसंपन्न विलासिनी, संगीतशास्त्रनिपुण गवई आणि रंगेल खुषमस्करे ह्यांचाच असल्यामुळें, तेथें गहन राजकारणें किंवा शस्त्रांचा खणखण आवाज, किंवा विद्वानांचें पांडित्य ऐकूं न येतां, तेथें गवयांचे मधुर आलाफ , स्त्रियांचे नेत्रकटाक्ष, आणि खुषम-

स्कऱ्यांचा हास्यरसोत्पादक विनोद ह्यांवांचून दुसरें कांहीं नसावें ह्यांत आश्चर्य तें काय? येथील देखाव्याचें चित्र एका महाराष्ट्रकवीच्या वाणीनें अधिक चांगलें लक्ष्यांत येण्यासारखें आहे.

### साक्या.

लगबग लगबग साज करोनी वारवधू मग आली।
सगें तबला सारंगीही घेउनि आपुली आली ॥ १ ॥
अवयव सकलहि बघुनि म्हणती नासा जैसी।
शुकनासा ही भ्रूवल्लीही कामधनुर्ज्या तैसी ॥ २ ॥
चंद्रवदन मृदु कुंदरदनही करकिसलय मृदु हाले।
नयनमीन हे हृदयकवन जणुं मदनधि मारी भाले ॥ ३ ॥
ख्याल, ध्रुपदें, ठुमऱ्या, प्रबंध गाते तरणे।
अभिनव अभिनय पाहुनि होती वृद्ध समाजहि तरणे ॥ ४ ॥

असो. कैसरबाग राजवाडा सांप्रत आपल्या पूर्ववैभवास मुकला असून सर्व जगास अनाचारदुष्परिणामाचें चित्र आपल्या दीन स्वरूपानें दाखवीत आहे. इ० स० १८५७ च्या बंडाच्या वेळीं ह्याचा बराच नाश झाला, म्हणून त्यावर दया करून ब्रिटिश सरकारानें त्यास अयोध्येच्या तालुकदारांच्या स्वाधीन केलें आहे लेफ्टनंट गव्हरनर, व्हाईसरॉय वगैरे बड्या अधिकाऱ्यांच्या सत्कारार्थ येथें केव्हां केव्हां दरबार भरत असतात, व त्याच प्रसंगीं रोषनाई व आतषबाजी ह्यांचीही शोभा दृष्टीस पडते. ह्या राजवाड्याचें बांधकाम इ० स० १८५० मध्ये पुरें झाले असून त्यास सुमारें ८० लक्ष रुपये खर्च लागला असे म्हणतात. वाजिदअल्लीशहा हा इ० स० १८५६ मध्यें पदच्युत झाल्यामुळें त्यानें फक्त ६ वर्षेंच त्याचा उपभोग घेतला असावा असें दिसतें.

## दिलखुषप्रासाद.

दिलखुषप्रासाद हें लखनौंतील दर्शनीय स्थलांपैकीं एक उत्कृष्ट स्थळ होय. हा राजवाडा सादतअल्लीखान ह्यानें आपल्या कारकीर्दींत (इ० स० १७९७–इ० स० १८१४) वनगृह म्हणून बांधिला होता. येथें कृत्रिम सौंदर्यापेक्षां सृष्टिसौंदर्य विशेष आहे. येथील वनश्रीचा उपभोग घेण्याकरितां नवाब सादतअल्लीखान हा वर्षांतून

कांहीं दिवस येथें येऊन राहत असे. ह्या राजवाड्यासभोंवतीं त्यानें एक विस्तीर्ण क्रीडावन केलें असून तेथें तो मृगया करीत असे. त्याकरितां त्यानें हरिणें व अनेक वन्यपक्षी ठेविले होते. विशेषेकरून उष्णकालामध्यें तो आपल्या अतःपुरासहवर्तमान येथें येऊन वसंतविलास करीत असे. ह्या राजवाड्यासबंधानें एका आंग्लकवीने पुढील वर्णन केलें आहे:—

"A country seat where Kings of Oudh of yore
Fled city heat with their barbaric court,
Encircled by a park where Eastern dames
Screened from strange eyes indulged in listless sport."

ह्यावरून ह्या उपवनप्रासादाची वाचकांस कल्पना करिता येईल. येथेंच विमानोड्डाण वगैरे शास्त्रीय प्रयोग केव्हा केव्हा होत असत. इ० स० १८३० मध्ये एका इंग्रज गृहस्थाने येथून एक विमान उडविले, त्या वेळीं लखनौचा नबाब नासिरउद्दीन हैदर व त्याचे सर्व दरबारी लोक येथें जमले होते. दिलखुष राजवाडा इ० स० १८५७ च्या बंडामध्यें बडवाल्यानीं आपल्या ताब्यांत घेतला होता, परंतु सर कोलिन क्यांपबेल ह्यांनीं त्यांचा पराभव केल्यानतर तो इंग्रजांच्या ताब्यांत आला. नंतर अयोध्येच्या इंग्रजी सैन्याचे अधिपति ह्यांनीं येथे आपले निवासस्थान केलें होते. ह्या राजवाड्यामध्ये सुप्रसिद्ध इंग्रज सेनापति सर हेन्री हॅवलॉक हे ता० २४ नोव्हेंबर इ० स० १८५७ रोजीं मृत्यु पावले. सांप्रत ह्या राजवाड्याचें पूर्वस्वरूप राहिले नसून त्यात आंग्लाभिरुचीप्रमाणें फेरफार केले आहेत व त्याच्या सभोंवतीं सुंदर पुष्पवाटिका व लतामडप केले आहेत. यामुळें त्याचें रूक्ष स्वरूप बदललें जाऊन तो एक नयनानंददायक दृग्विषय होऊन राहिला आहे, व त्याचें 'दिलखुषप्रासाद' हें नांव सार्थ वाटत आहे.

## ला मार्टिनेरी कॉलेज.

लखनौंतील प्रेक्षणीय व भव्य इमारतींपैकीं ला मार्टिनेरी ही एक इमारत आहे. हिला 'कान्स्टंशिया' अथवा 'मार्टिनकोठी' अशीं हीं दोन नांवें आहेत. पैकीं पहिलें नांव, ह्या कॉलेजचे "Labour et constantia" (श्रम आणि सततउद्योग) ह्या आदर्शवाक्यावरून पडलें आहे. दुसरें नांव, 'ला मार्टि-

नेरी' ह्या फ्रेंच नांवाचे भाषांतर आहे. ही इमारत क्लाड मार्टिन म्हणून एक फ्रेंच पुरुष अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला ह्याचे कारकीर्दींत आला होता त्यानें बांधली आहे. हा पुरुष फार साहसी व बुद्धिवान् होता. हा शिल्पकलेंत निष्णात असून ह्यानें हिंदुस्थानांत पहिल्यानेंच विमान उडविलें होतें. ह्याजवर सुजाउद्दौल्याची मर्जी जडल्यामुळें त्यानें त्यास आपल्या राज्यांत नेऊन दारूगोळा व शस्त्रास्त्रे ह्यांच्यावरील मुख्य अधिपति केलें होतें. सुजाउद्दौल्याच्या मृत्यूनंतर अयोध्येस ज्या राजकीय उलाढाली झाल्या त्यांत ह्याने आपला उत्कर्ष करून घेऊन विपुल धन सपादन केलें. असफउद्दौल्याच्या कारकीर्दीत हा इतका धनसंपन्न बनला कीं, ह्यानें निरनिराळ्या पेढ्या घातल्या व अयोध्येच्या लोकांबरोबर देण्याघेण्याचा व्यापार करूं लागला. त्यामुळे त्याची संपत्ति वाढत चालली. ह्यानें 'फरहतबक्ष' व ला मार्टिनेरी अशा दोन सुंदर इमारती बाधल्या. ह्यापैकीं पहिली इमारत असफउद्दौल्यानें विकत घेतली व दुसरीही विकत घेण्याकरितां त्याने १० लक्ष रुपये देण्याचें कबूल केले; परंतु ह्या फ्रेंच गृहस्थानें ती विकत दिली नाहीं. त्यानें आपल्या पश्चात् ह्या इमारतीचा व द्रव्याचा विनियोग शिक्षणाकडे करावा अशा उद्देशानें एक मृत्युपत्र करून ठेविले व ज्योसेफ क्युरोस नामक एका गृहस्थास त्याची सर्व व्यवस्था सांगितली. हा पुरुष ता० १३ सप्तंबर इ० स० १८०० मध्यें मरण पावला. त्याचे प्रेत ह्या इमारतींतील एका भागामध्यें पुरलें आहे. क्लाड मार्टिन ह्याच्या पश्चात् त्याच्या इच्छेप्रमाणें येथें एक विद्यालय सस्थापित होऊन ते अद्यापि चालत आहे.

क्लाड मार्टिन ह्यानें बांधलेली इमारत भव्य असून तिची रचना सशास्त्र आहे. हिचें आंतील नक्षीकाम व निरनिराळे दिवाणखाने प्रेक्षणीय असून त्यांत विविध चित्रें काढलीं आहेत. हिच्या शिरोभागी मोठमोठे सिंह काढले असून अगदीं अत्युच्च शिखरांवर मनुष्याकृति पुतळे उभे केले आहेत. त्या सर्वांवर प्रस्तुत "युनियन जॅक" हें निशाण फडकत असते. ह्या इमारतीचे पुढील भागीं एक सुंदर कृत्रिम तलाव असून त्याच्या मध्यभागीं १२३ फूट उंचीचा एक स्तभ आहे. इ० स० १८५७ च्या बंडामध्यें बंडवाल्यांनीं ह्या इमारतीच्या आंतील कित्येक दर्शनीय वस्तूंचा नाश केला व क्लाड मार्टिन ह्याचें थडगें छिन्नविच्छिन्न करून त्याच्या

अस्थी फेंकून दिल्या. परंतु बंडाची समाप्ति झाल्यानंतर त्यांची पूर्ववत् व्यवस्था झाली.

ह्या इमारतीमध्यें **क्लाड मार्टिन** ह्याच्या बुद्धिचातुर्याच्या दर्शक अशा कांहीं वस्तु अद्यापि दृष्टीस पडतात. ह्या इमारतीच्या मध्यभागीं एक प्रचंड घंटा टांगलेली आहे. ती **जनरल क्लाड मार्टिन** ह्यानें इ० स० १७८६ ह्या वर्षी तयार केली होती. त्याचप्रमाणें ह्या इमारतीच्या पश्चिमेकडील उद्यानभूमीमध्यें एक पितळी तोफ आहे ती ह्याच पुरुषाने तयार केली असून, तिच्या साह्यानें **लॉर्ड कॉर्नवालिस** ह्यानीं इ० स० १७९२ साली **श्रीरंगपट्टणावर** हल्ला केला व **टिपू सुलतानास** पराभूत करून तेथे विजयध्वज लाविला. हिच्यावर "**लॉर्ड कॉर्नवालिस**" अशीं अक्षरें लिहिलीं आहेत. ही तोफ **क्लाड मार्टिन** ह्याच्या स्मारकार्थ, **गव्हरनर जनरल लॉर्ड नॉर्थब्रूक** ह्यांच्या परवानगीनें, ह्या कॉलेजाच्या उद्यानभूमीमध्ये, मुद्दाम आणून ठेविली आहे. ती पाहून प्रेक्षकास क्षणभर विस्मयानंद वाटून **क्लाड मार्टिन** ह्याच्या बुद्धिकौशल्याचें अभिनंदन केल्यावाचून राहवत नाही.

**ला मार्टिनेरी** ह्या प्रचंड इमारतीचें अवलोकन केले म्हणजे **आंग्लकवीनें** उद्धृत केलेले पुढील विचार मनात येतात—

"'Tis said that memory is life,  
And that, though dead, men are alive.  
Removed from sorrow, care, and strife,  
They live because their works survive.

## लाल बारद्वारी.

ही इमारत **लखनौचा** नवाब **सादतअलीखान** ह्यानें बांधली आहे. ही सर्व तांबड्या दगडांची असल्यामुळें हिला '**लाल बारद्वारी**' असें नांव पडले आहे. **आग्रा** व **दिल्ली** येथें **मुमताजउद्दौला** आणि **दिवाण-इ-आम** म्हणून ज्या प्रसिद्ध लालरंगाच्या इमारती आहेत त्यांची बरोबरी करण्याच्या उद्देशानें ही इमारत बांधली आहे. येथें नवीन नवाबास राज्याभिषेक करण्याचा परिपाठ असे, म्हणून ह्या इमारतीस 'राज्याभिषेकप्रासाद' असें नांव मिळालें आहे. **इंग्लंडमध्यें**

'वेस्टमिन्स्टर हॉल' म्हणून ज्याप्रमाणें एक राज्याभिषेकाकरितां स्वतंत्र इमारत आहे त्याप्रमाणें हीही इमारत आहे. येथें लखनौच्या नबाबाचें सिंहासन असून सादतअलीच्या मागून झालेल्या सर्व नबाबांचे राज्यारोहणसमारंभ येथेच झाले. नासिरउद्दीन हैदर मृत्यु पावल्यानंतर इ० स० १८३७ मध्यें बादशहा बेगम हिनें मुन्नाजान नामक मुलास गादीवर बसविण्याचा जो यत्न केला व त्यामुळें जो रक्तपात झाला तो ह्याच राजवाड्यांत झाला. ह्या राजवाड्यांतील मुख्य दरबार-महालांत त्या वेळी मोठमोठे आरसे होते, व जिकडे तिकडे रोषनाई केलेली होती. मुन्नाजान ह्यास राज्याभिषेक करण्याकरितां बादशहा बेगम हिनें त्यास ह्या महालांत आणिले होतें. त्या वेळी रेसिडेट कर्नल लो ह्यानीं त्याचा राज्याभिषेक करण्यास प्रतिबंध केला. त्यामुळे उभय पक्षांच्या लोकांची चकमक उडाली. त्या गडबडींत ब्रिटिश सैन्यातील लोक राजवाड्यांत शिरले. त्यास आरसेमहा-लाची कल्पना नसल्यामुळें त्यांची प्रतिबिंबे जिकडे तिकडे दिसूं लागलीं; त्यामुळे त्यांस ते शत्रूचे लोक आहेत असे वाटून त्यांनी आरशावर गोळ्या मारल्या व तेथील सामानाचा फार नाश केला! शेवटी बादशहा बेगम व मुन्नाजान ह्यांचा पराभव होऊन तीं उभयतां ह्याच राजवाड्यांत इंग्रजांच्या हातीं सांपडलीं ह्या इतिहास-प्रसिद्ध महत्त्वाच्या गोष्टीमुळे हा राजवाडा प्रख्यात आहे. त्याचप्रमाणे बंडाची समाप्ति झाल्यानंतर अयोध्येच्या तालुकदारांस लॉर्ड क्यानिंग ह्यांनीं ह्याच राज-वाड्यांत भेटीस बोलाविलें व त्याच्यावर क्षमा करून राणीसाहेबाचा जाहीरनामा येथेंच प्रसिद्ध केला. त्या योगानेंही ही इमारत लखनौच्या लोकांच्या स्मरणास विशेष कारण झाली आहे. येथे प्रसंगविशेषीं अद्यापि मोठमोठे दरबार भरत असतात. सांप्रत येथें अयोध्याप्रांताचें पदार्थसंग्रहालय केलें असून येथे निरनिराळ्या अर्वा-चीन व प्राचीन वस्तु, जुन्या तसबिरी, शिलालेख, प्राचीन मूर्ति, कलाकौशल्याचीं कामे, व पशुपक्षी वगैरे ठेविले आहेत. ह्यामध्यें इ० स० २२३-२२४ ह्या वर्षी समुद्रगुप्त राजानें जो अश्वमेध केला, त्या अश्वाची हुबेहुब प्रतिकृति नेपाळ प्रांतां-तील खैरीगडच्या जंगलामध्यें सांपडली, ती येथें आणून ठेवलेली आहे. ती प्रेक्षणीय आहे. त्याचप्रमाणें येथील दरबारमहालामध्यें लखनौच्या सर्व नबा-बांच्या तसबिरी आहेत त्याही फार सुंदर असून पाहण्यासारख्या आहेत. ज्या

ठिकाणीं पूर्वी अयोध्येचे नवाब सिंहासनाधीश्वर होत होते त्या ठिकाणीं प्रस्तुत त्यांच्या प्रतिकृति दृष्टीस पडाव्या हे केवढे चमत्कारिक स्थित्यंतर आहे ?

## रेसिडेन्सी.

ही इमारत लखनौच्या ब्रिटिश रेसिडेंटाच्या निवासस्थानाकरितां नवाब सादतअलीखान ह्यानें इ० स० १८०० मध्यें बांधली असून, तिचें पूर्व स्वरूप लखनौ येथें इ० स० १८५७ सालीं जें भयकर बड झाले, त्यामुळें सर्वस्वीं नष्ट झालें आहे. तथापि ह्या बंडांत ब्रिटिश सेनापतींनीं जे अलौकिक रणशौर्य गाजविले त्याचें उत्तम स्मारक ही रेसिडेन्सी आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं. येथें जो घनघोर रणसग्राम झाला, त्याची कल्पना ह्या रेसिडेन्सीच्या प्रस्तुत छिन्नविच्छिन्न स्वरूपावरून करितां येतें. ही इमारत तोफाच्या हजारो गोळ्यांनीं अगदीं जर्जर होऊन गेली आहे. तिचे प्रस्तुतचे भयाण स्वरूप पाहून बंडाच्या वेळची तुमुल युद्धाची उत्तम साक्ष पडते. हिच्या कोटासारख्या अजस्र भिंती अग्नियंत्रांनीं सहस्रशः ठिकाणीं जीर्ण होऊन गेल्या आहेत. त्यांचे प्रस्तुत स्वरूप अवलोकन केलें म्हणजे त्या, लढाईमध्ये जखमी झालेल्या योद्धया-प्रमाणें मोठ्या गर्वानें आपला पराक्रम दाखवीत आहेत असे वाटतें। ह्या स्थली मृत झालेल्या रणशूर आंग्लवीरांचीं प्रेतें, जागोजाग पुरून त्यावर स्मारकस्तभ उभारले आहेत. सर जॉन हॅवलॉक, सर हेन्री लॉरेन्स वगैरेंच्या कबरी-वरील स्मारकस्तभ अत्यंत उंच असून ते त्याच्या शौर्यातिशयाचे पोवाडे गाण्याक-रितां विच्छिन्न भिंतीतून व कबरस्थानांत उगवणाऱ्या रक्तपुष्पांच्या वेलींमधून आपलीं गर्विष्ठ शिखरें बाहेर काढीत आहेत असे वाटते. तेथें गेले म्हणजे मानवी देहाची क्षणभगुरता, रणवैभवाची योग्यता, आणि धारातीर्थी मरण पावल्यामुळें शूर जनांच्या कीर्तीस आलेली तेजस्विता उत्तम प्रकारें दृष्टीस पडते. येथे एकसारखा ८६ दिवस शत्रूंच्या प्रचंड सैन्याचा वेढा पडला होता; व एकसारखा तोफांचा भडिमार होत होता. तथापि त्यास हार न जाता इंग्रज लोकांनीं मोठ्या धैर्यानें आपला टिकाव धरिला होता. त्यांत त्यांच्यापैकीं ३५० युरोपियन सोल्जर्स, ४१ लष्करी अंमलदार, व २ मुलकी अधिकारी मृत्यु पावले. परंतु

त्यांनीं अखेरपर्यंत आपला दम सोडला नाहीं. अखेर युरोपियन सैन्य मदतीस येऊन त्यांची सुटका झाली व ब्रिटिश सत्तेचा विजयध्वज लखनौ येथें संस्थापित झाला. तो अद्यापि ह्या रेसिडेन्सिवर मोठ्या गर्वाने फडकत आहे. लॉर्ड क्यानिंग साहेबांनीं ह्या इंग्रज सैन्याच्या शौर्याबद्दल असे उद्गार काढले आहेत कीं :—

"There does not stand records in the annals of war an achievement more truly heroic than the defence of the residency at Lucknow."

हे उद्गार रेसिडेन्सीमधील एका खोलीमध्यें अद्याप कोरून ठेविले आहेत, व तेथेंच दोन खणांमध्ये काचेच्या तावदानांची पेटी करून त्यांत ह्या युद्धाचा देखावा तयार केला आहे. तो प्रेक्षणीय असून लखनौच्या रणप्रसंगाचे भयंकर स्वरूप अद्यापि व्यक्त करीत आहे. असो.

वर लिहिलेल्या मुख्य मुख्य इमारतींशिवाय लखनौ येथे बिबियापूर कोठी, हयातबक्ष कोठी, बेगमकोठी, अमदजअल्लीशहाचा मकबरा, नूरबक्ष कोठी, सादतअल्लीखानाचे थडगे, फरहतबक्ष राजवाडा, मच्छीभवन, रुमाई दरवाजा, दौलतखाना, हुसेनाबाद इमामवाडा, जुम्मामशीद, मोतीमहाल राजवाडा, खुर्शेद-मंझील, तारावाली कोठी, शहानजफ, कदमरसूल, अलमबाग, शिकदरबाग, पाद-शहाबाग, विलायतीबाग, वगैरे अनेक प्रेक्षणीय स्थळें आहेत. ह्यांपैकीं कांहीं राज्यक्रांतीमुळे पूर्वीच्या स्वरूपास अगदी मुकलीं आहेत. कांहीं कालचक्रास हार जाऊन आपल्या पूर्वस्वरूपांत नवीन तऱ्हेचे मिश्रण घालून जीवंत राहिलीं आहेत. कांहीं आपला बाणा न सोडतां अद्यापि आपल्या पूर्वस्वरूपानें प्रेक्षकास थक्क करीत आहेत. ह्या स्थलांचे दर्शन घेतलें असता प्रेक्षकांच्या मनावर विशेष सस्कार होऊन ऐहिक गोष्टीच्या क्षणभगुरत्वाविषयीं त्यांची चांगली खात्री पटते व शेवटीं ह्या जगात सत्कृति हीच मानवी आयुष्याचें सार्थक करणारी असून, तीच त्यास कीर्तिरूपानें चिरकाल जीवत ठेविते असें वाटू लागतें. अशा प्रकारचा उज्ज्वल प्रकाश ज्या ऐतिहासिक स्थलदर्शनाने प्राप्त होतो त्याचें माहात्म्य अधिक वर्णन काय करावें ?